V. C. Mogarkar

# कस्तूरी कुंडल बसै

-भगवानश्री रजनीश

अनुवाद
आणि : मा आनंद वंदना
संपादन

जीवन जागृती केंद्र प्रकाशन

© श्री रजनीश फौंडेशन, पुणे १

•

प्रकाशक :
स्वामी अमृत बोधिधर्म,
१०१, टिंबर मार्केट,
पुणे २

•

प्रथम आवृत्ती :
ऑक्टोबर १९७६
प्रती ३,०००

•

किंमत रु. ३-००

•

मुद्रक :
श. वि. पाटील,
विशाल सह्याद्रि प्रेस,
सह्याद्रि सदन, टिळक रोड
पुणे ३०

# कस्तूरी कुंडल बसै

( संत कबीरावर भगवानश्रींनी दिलेल्या प्रवचन-मालेतील पहिले प्रवचन )

**तेरा जन एकाध है कोई ।**
**काम क्रोध अरू लोभ विवर्जित, हरिपद चीन्है सोई ॥**
**राजस तामस सातिग तीन्यू, ये सब तेरी माया ।**
**चौथे पद कौ जे जन चीन्है, तिनहीं परमपद पाया ॥**
**अस्तुति निंदा आसा छाडै, तजै मान अभिमाना ।**
**लोहा कंचन सम करि देखै, ते मूरति भगवाना ॥**
**च्यंतै तो माधो च्यंतामणि, हरिपद रमै उदासा ।**
**त्रिस्ना अरू अभिमान रहित ह्वै, कहै कबीर सो दासा ॥**

**भगवानश्री-**

तिबेटातल्या एका आश्रमात जवळजवळ हजार वर्षांपूर्वी एक छोटीशी घटना घडली. तिच्याद्वारेच आपण कबीरात प्रवेश करू या.

मोठा आश्रम होता हा. अन् या आश्रमानं एक छोटा नवा आश्रमदेखील दूर तिबेटाच्या सीमेपाशी सुरु केला होता.

आश्रम बनला. निरोप आला की सारी तयारी झाली आहे. आता आपण एक योग्य संन्याशी धाडावा, जो गुरुचं पद सांभाळून घेईल.

मुख्य आश्रमानं दहा संन्यासी निवडले अन् दाही जणांना त्या आश्रमाकडे धाडलं. सारा आश्रम चकित झाला. जवळजवळ हजार संन्यासी आश्रमात राहात होते. ते म्हणाले, 'ही गोष्ट उमगली नाही... एकाला बोलावलं होतं... दहांना पाठवलं ?' उत्सुकता शिगेला पोचली. जिज्ञासा आवरता आवरेना. तेव्हा काही संन्यासी गेले अन् गुरुला म्हणाले की, 'आम्ही समजू नाही शकलो... एकालाच बोलावलं होतं, आपण दहा जणांना का पाठवलंत ?' गुरु म्हणाला, 'थांबा... जेव्हा ते पोचतील तेव्हा मी तुम्हाला सांगेन.'

प्रवास दूरवरचा होता. डोंगराळ भाग होता. पायी जायचं होतं. तीन आठवड्यांनी बातमी पोचली की आपण जो एक संन्यासी धाडला होता तो पोचला !

आता अजूनच पंचाईत झाली! आता तर साऱ्या आश्रमात एकच चर्चा होत होती की हे तर गूढ उलगडलं नाही, अजून गुंतागुंतीचं बनलं... दहांना पाठवलं होतं अन् बातमी आली की एकच पोचला! मग त्यांनी गुरूला विचारलं. तेव्हा गुरू म्हणाला की दहांना पाठवलं तर एक पोचतो!

मग सारी कथा मागाहून समजली. दहा प्रवासाला निघाले होते. पहिल्याच गावात शिरले अन् एक माणसान सकाळी सकाळीच नगराच्या वेशीवर, पहिल्या संन्याशाचे पाय धरले अन् म्हणाला, 'ज्योतिषानं सांगितलं आहे की जो कुणी माणूस उद्या सकाळी पहिल्यांदा प्रवेश करील त्याच्याशीच मी माझ्या मुलीचं लग्न लावून द्यावं. ही माझी मुलगी. अन् इतकी संपत्ती माझ्यापाशी आहे. दुसरा कुणी वारस नाहीये. एकुलती एक मुलगी आहे. कुणी दुसरा मुलगा वगैरे नाही... ज्योतिषी म्हणाला की जर पहिला माणूस नकार देखील तर जो दुसरा असेल...दुसरा नकार देईल तर तिसरा...तर तुम्ही दहा एकदम आहा. कुणी ना कुणी स्वीकारून घेईलच...'

पहिल्यानंच स्वीकारून घेतली! मुलगी खूप सुंदर होती. पैसादेखील पुष्कळ होता. तो आपल्या मित्रांना म्हणाला की माझं जाणं नाही होऊ शकणार. परमात्म्याची मर्जी अशीच दिसते आहे की मी याच गावात थांबावं.

दुसऱ्या गावात ते पोचले तर गावच्या राजाचा जो पुजारी होता तो मरून गेला होता अन् राजा एका नव्या पुजाऱ्याच्या शोधात होता. चांगली नोकरी होती. राजेशाही थाट होता. शिवाय कामही काही नव्हतं! तर एक संन्यासी तिथे थांबला! अन् असंच...!

पोचता पोचता... जेव्हा आश्रम फक्त दहा मैल दूर होता, ते एका गावात एका संध्याकाळी थांबले. दोघंच उरले होते! गावच्या लोकांनी एक व्याख्यान आयोजित केलं होत. त्यात एक बोलला. जेव्हा तो बोलत होता तेव्हा एक नास्तिक मधे उभा राहिला अन् म्हणाला, ही सारी व्यर्थ बडबड आहे! हा बुद्ध अन् बुद्ध वचनं हे सारं कवडी मोलाचं आहे, कचरा आहे. यात कुठलं सार नाही...' जो संन्यासी बोलत होता तो आपल्या मित्राला म्हणाला, आता तू जा. मी इथंच राहाणार आहे. या नास्तिकाला आस्तिक बनवल्याशिवाय मी या गावातून हलणार नाहीये...'!

असा एक जण पोचला!

दहा जण चालतात तेव्हा एक पोचतो.

या घटनेच्या आधारे तिबेटमधे एक म्हण पडली की दहा चालतात तेव्हा एक पोचतो.



मार्ग कंटकाकीर्ण आहे. अन् खूप प्रलोभनं आहेत मार्गावर. जागोजागी थांबण्याची शक्यता आहे. अन् प्रलोभनं प्रबळ आहेत. अन् मार्ग अवघड आहे. चढ आहे. एकेक पाऊल उचलायला श्रम लागतात, निष्ठा लागते. हा उतरणीचा मार्ग नाहीये, जिथे सहज कुणी घरंगळू शकतो. इथे चढ आहे. जबरदस्त चढ आहे. पडण्याच्या साऱ्या प्रकारच्या शक्यता आहेत. पडण्याची साऱ्या प्रकारची सूक्ष्म कारणं हजर आहेत. म्हणून दहा चालले अन् एक जरी पोचला तरी पुरेसं आहे.

इजिप्तमधे लोक म्हणतात की हजार बोलावले जातात अन् एकाला निवडलं जातं अन् मला वाटतं तिबेटपेक्षा त्यांची म्हण जास्त बरोबर आहे. दहा चालावेत अन् एक पोचावा हेदेखील शक्य नाही वाटत... हजार बोलावले जातात अन् एक निवडला जातो.

येशूला कुणी विचारलं की तुझ्या परमात्म्याचं राज्य कसं आहे? तर येशू म्हणाला की कोळ्याच्या जाळ्यासारखं.

कोळी जाळं फेकतो. शेकडो मासे अडकतात. जे योग्य आहेत, खाण्याजोगे आहेत ते निवडले जातात. उरलेले माघारी पाण्यात फेकून दिले जातात.

तेव्हा येशू म्हणाला की परमात्म्याचं राज्य कोळ्याच्या जाळ्यासारखं आहे. परमात्मा जाळं टाकतो. लाखो अडकतात. पण बोटावर मोजण्याइतके निवडले जातात, जे तयार आहेत. उरलेले पुन्हा पाण्यात फेकून दिले जातात. पाणी म्हणजे जग.

अशाच प्रकारे तर तुम्ही वारंवार फेकले गेले आहा. असं नाहीये की जाळ्यात नाही अडकला. किती तरी वेळा अडकला आहा, पण तुम्ही योग्य नव्हता की निवडले जाऊ शकला असता. जाळ्यात अडकणं पुरेसं नाहीये. कोळ्याला आवडणंदेखील अगत्याचं आहे. जाळ्यात तर तुम्ही अडकता, जाळ्यामुळे. पण कोळी तर तुम्हाला निवडेल, तुमच्यामुळे. हजार वेळा तुम्ही अडकला आहा—न जाणो किती वेळा संन्यास घेतला असेल. न जाणो किती वेळा भिक्षू बनला असाल. न जाणो किती वेळा घरदार सोडलं असेल, आश्रमात राहून घेतलं असेल. किती वेळा प्रार्थना केली आहे. किती वेळा संकल्प केले, किती व्रतं, किती उपवास... तुमच्या अनंत जन्मांची अनंत कथा आहे. पण एक गोष्ट निश्चित आहे की जरी तुम्ही जाळ्यात कितीही वेळा अडकला असाल; वारंवार माघारी पाण्यात फेकून दिले गेले असाल, तुम्ही निवडले नाही जाऊ शकला. निवडले जाण्यासाठी पात्रता हवी. निवडलं जाऊ शकावं यासाठी अंतर्यामीचं बळ हवं, ऊर्जा हवी... निवडलं जाऊ शकावं यासाठी पात्रता हवी.

अन् ती पात्रता मिळवणं अवघड आहे. खूप अवघड आहे. या जगात सारं काही मिळवणं सोपं आहे. तुम्ही जसे आहा तसंच राहून या जगातल्या

साऱ्या गोष्टी मिळवल्या जाऊ शकतात. पण परमात्मा मिळवणं अवघड आहे. कारण तुम्ही जसे आहा तसंच राहून परमात्मा नाही मिळवला जाऊ शकत. तुम्हाला बदलावं लागेल अन् बदल असा की तुम्हाला काहीस ना काहीसं परमात्म्यासारखं व्हावं लागेल. तेव्हाच तुम्ही परमात्मा मिळवू शकाल. कारण जो परमात्म्यासारखा नाहीये, तो कसा परमात्मा मिळवू शकेल. कुठलं साम्य हवं, जिथून सेतू बनू शकेल. कुठला एखादा किरण तर हवा तुमच्यात सूर्याचा, ज्या आधारे तुम्ही सूर्याची यात्रा करू शकावी.

आपण दूधाचं दही बनवतो तेव्हा थोडंसं दही त्यात टाकतो. मग सारं दूध दही होऊन जातं. तेव्हा तुमच्यात थोडासा तर परमात्मा असायलाच हवा. तेव्हाच तुमचं सारं दूध दही होऊ शकेल. तितकंही नसेल तर यात्रा नाही होऊ शकणार. अन् तिथेच अडचण आहे ! कारण थोडंसंही परमात्म्यासारखं होणं तुमची सारी जीवन–व्यवस्था बदलण्याखेरिज नाही होऊ शकणार. तुमची सारी जीवनाची पद्धत अन् स्टाईल बदलावी लागेल.

म्हणून कबीर म्हणतो, 'तेरा जन एकाध है कोई–'

असे कोटी–कोटी लोक आहेत. मंदिरं आहेत, मशिदी आहेत, गुरुद्वारे आहेत. लोक प्रार्थना करताहेत, पूजा करताहेत, अर्चना करताहेत. पण 'तेरा जन कोई एकाध'च आहे !

मोठी पृथ्वी आहे. कोटयावधि–अब्जावधि लोक आहेत. मंदिरांचीही कुठली उणीव नाहीये. पूजा–प्रार्थनादेखील खूप चालू आहे. पूजेचं धूप जळतं आहे, दिवे तेवताहेत. पण पूजेचा आतमा नाहीये. पूजा होते आहे बाहेरच्या मंदिरात, अंतर्यामीच्या मंदिरात पूजेचा कुठला स्वर नाहीये. मोठी सजावट आहे बाहेरच्या मंदिरात. अंतर्यामीचं मंदिर अगदो सूनं आहे. तेव्हा तुम्ही मंदिरात कितीही जा, पोचू नाही शकणार. कारण त्याचं मंदिर काही दगड–विटांचं मंदिर नाहीये. त्याचं मंदिर तर परम चैतन्याचं मंदिर आहे. त्याचं मंदिर काही माणसानं बनवून नाही बनत. गोष्ट तर अगदी उलट आहे त्याच्या बनवण्यानं माणूस बनला. माणूस त्याचं मंदिर बनवून कुणाला फसवतो आहे ?

तुम्ही बनवलेल्या मंदिरांद्वारे तुम्ही कुठेही नाही पोचू शकणार. तुम्ही बनवलेली मंदिरं तुमच्याहून लहान असतील. योग्यदेखील आहे. गणित स्पष्ट आहे. तुम्ही जे बनवाल ते तुमच्याहून मोठं कसं असू शकेल ? बनवली गेलेली वस्तू बनवणाऱ्यापेक्षा मोठी नाही असू शकत. कविता कितीही सुन्दर असो, कवीहून मोठी थोडीच होऊ शकेल ? अन् संगीत कितीही गोड असो, संगीतज्ञाहून मोठं नाही होऊ शकणार. मूर्ति कितीही सुन्दर असो, मूर्तिकाराहून तर सुन्दर नाही



होऊ शकणार. बनवणारा वरच राहील, कारण बनवणाऱ्याच्या शक्यता अजून शिल्लक आहेत. सारं संपून नाही गेलं. तो याहूनही श्रेष्ठ बनू शकतो. जो एक सुन्दर गीत गायला तो याहूनही हजार सुन्दर गीतं गाऊ शकतो. अन् तो कितीही गीतं गाऊ देत, प्रत्येक गीताच्या वरच तो राहील.

तुम्ही बनवलेली मंदिरं तुमच्याहून मोठी नाही असू शकत. तुम्ही बनवलेल्या परमात्म्याच्या प्रतिमा तुमच्याहून लहान असतील. तुम्हीच त्यांचा स्रष्टा आहा. तुमचा काम, तुमचा क्रोध, तुमचा लोभ; मायामोह सारं तुमच्या मूर्तीमधे समाविष्ट होऊन जाईल. तुमचे हातच तर स्पर्श करतील अन् निर्मिती करतील. तुमच्या हातचं विष तुमच्या मूर्तीमधेदेखील उतरून जाईल. तुम्ही बनवलेली मंदिरं तुमच्याहून चांगली नाही असू शकत. अन् जर तुमचं मन कुंटणखान्यात गुंतलं असेल तर तुमची मंदिरं कुटणखान्याहून चांगली नाही असू शकत. तुम्ही जिथे आहा, तुम्ही जसे आहा–– तुमचीच तर प्रतिकृति निनादेल ! तुमचीच तर धुन, चाल मागे राहील तिथे ! म्हणूनच तर परमात्म्याची मंदिरं आहेत ती नावापुरतीच परमात्म्याची आहेत, बनवलेली माणसानं आहेत !

अन् कदाचित् म्हणूनच मदिरांनी जगताचं जितकं नुकसान झालं तितकं कुठल्या दुसऱ्या गोष्टीनं नाही झालं. मंदिरांनी अन् मशिदींनी लोकांना लढत द्यायला लावलं आहे. कारण ज्यांनी बनवली होती त्यांची हिंसा त्यात उतरली. मंदिरांनी अन् मशिदींनी माणसांना जोडलं नाही, तोडलं आहे. त्यांच्यामुळे पृथ्वीवर स्वर्ग नाही अवतरला. उलट नरकाची झलक किती तरी वेळा मिळाली आहे.

बरोबरही वाटतं. स्पष्ट आहे बाब. कारण ज्यांनी बनवली आहेत त्यांची घृणा, त्यांची हिंसा, त्यांची आक्रमणाची वृत्ति, त्यांचं दुष्टपण, त्यांची क्रूरता सारं मंदिरांमधे अन् मशिदींमधे प्रवेशून गेलं आहे.

तुमच्या मंदिरात तुम्ही कुणाची पूजा करता आहा ? स्वतःची पूजा करता आहा ? तुमची मंदिरं तुमचाच आरसा आहे, ज्यात तुमचंच प्रतिबिंब दिसतं आहे. म्हणून तर मंदिर अन् मशिद यातून तुम्ही कितीही भटकंती करा, तुम्ही पोचू नाही शकणार. तुम्हाला जर परमात्म्याला शोधायचं असेल तर तुम्हाला ते मंदिर शोधावं लागेल जे त्यानंच बनवलं आहे. ते मंदिर तुम्हीच आहा. कबीर म्हणतो, 'कस्तूरी कुंडल बसै'

तुम्हाला कस्तूरी–मृग ठाऊक असेल. कस्तूरी निर्माण तर होते हरिणाच्या नाभीत. कस्तूरीची पिशवी नाभीत निर्माण होते. अन् कस्तूरीचा जो सुवास आहे तो हरिणीला आकर्षून घेण्यासाठी आहे. जेव्हा हरिण कामातुर होतं, जेव्हा त्याची कामातुरता वाढते तेव्हा त्याच्या शरीरातून एक सुवास पसरू लागतो. तो सुवास मोठा मादक असतो. कस्तूरीसारखा कुठला सुगंध नाही. तो मोठा आकर्षक

असतो. त्यात चुंबकासारखं आकर्षण आहे. मस्तीनं भरून टाकतो तो सुगंध हरिणीला. हरिणी पागल होऊन जाते. ती आपली शुद्ध हरपून बसते.

हे तर ठीक आहे. ही तर नैसर्गिक व्यवस्था झाली. निसर्गानं तशी व्यवस्था केली आहे की मादी अन् नर एकमेकांशी चुंबकीय–आकर्षणानं बांधून राहावेत.

मोर नाचतो. त्याचा पिसारा, त्याचे रंग कामातुर बनवतात. त्याचं नृत्य, त्याच्या नृत्याचा झंकार मादीला आकर्षित करतो. कोकिळ गातो. त्याचा आवाज म्हणजे साद आहे. त्याच्या आवाजानं आकर्षित होऊन मादी येते. तसाच कस्तूरी–मृग आहे. त्याच्या नाभीत कस्तूरी निर्माण होते अन् तिचा वास मद्यासारखा आहे. त्या वासानं मादा आपलं भान हरपून बसते अन् समर्पण करून टाकते. इथवर तर ठीक आहे. पण कस्तूरी–मृगाबाबत एक वैताग आहे की त्याला स्वतःलादेखील वास येतो

मोर नाचतो तर स्वतः तर आपला पिसारा नाही पाहू शकत. पोपट साद घालतो वा कोकीळ गातो तरीदेखील कोकीळ पक्ष्याला ठाऊक आहे की गीत माझं आहे. पण कस्तूरी–मृगाला वास यायला लागतो अन् त्याला उमगत नाही की वास कुठून येतो आहे! मादी तर वेडीपिशी होतेच, पण नरदेखील वेडापिसा होऊन जातो अन् तो धावतो धुंद होऊन की कुठून तरी येत असेल–येतो तर आहे. तेव्हा तो स्रोताचा शोध घेतो. तो धावत राहातो. तो जिथे कुठे जातो, तिथे त्याला वास आढळतो! तो जवळजवळ वेडा होऊन जातो. डोकं रक्तबंबाळ होऊन जातं धावून, झाडाझुडूपात; जंगलात शोध घेऊन की वास कुठून येतो आहे? अन् वास त्याच्या अंतर्यामातून येतो–'कस्तूरी कुंडल बसै–'

कबीरानं मोठं गोड प्रतीक निवडलं आहे. ज्या मंदिराचा तुम्ही शोध घेता आहा ते तुमच्या 'कुंडलात' आहे, ते तुमच्या अंतर्यामी आहे, ते तुम्हीच आहा. अन् ज्या परमात्म्याची तुम्ही मूर्ति बनवता आहा त्याची मूर्ति बनवण्याची कुठली गरजच नाही, तुम्हीच त्याची मूर्ति आहा. तुमच्या अंतर्यामीच्या आकाशी तेवत असलेला त्याचा दिवा–तुमच्या अंतर्यामी त्याचं ज्योतिर्मय रूपडं उपस्थित आहे. तुम्ही वरून अगदी मातीचे दिवे असा पण अंतर्यामी तर चिन्मयाची ज्योत आहे. तुमचा देह मृण्मय असेल, तुमचं स्वरूप चिन्मय आहे. तुम्ही बाहेरून मातीचा दिवा आहा. ज्योत थोडीच मातीची आहे? दिवा पृथ्वीचा आहे, ज्योत आकाशाची आहे. दिवा जगाचा आहे, ज्योत परमात्म्याची आहे.

पण तुमची स्थिति तीच आहे, जी कस्तूरी–मृगाची. धावत राहाता. जन्मोजन्मी शोध घेता आहा–ज्याला तुम्ही कधी हरवलं नाही. शोध घेण्यामुळेच तुम्ही मुकला आहा. हा कस्तूरी–मृग वेडाच होईल. हा जितकं शोधेल तितका अडचणीत



सापडेल. जिथे जाईल, कुठेही जाईल, साऱ्या जगात भटकंती करेल तरीदेखील नाही मिळवू शकणार. कारण बाब सुरवातीपासून चूकीची झाली. जे अंतर्यामी होतं, त्यानं कल्पना करून घेतली की ते बाहेर आहे. कारण वास बाहेरून येत होता. त्याला वास बाहेरून येतो आहे असं वाटलं.

तुम्हालादेखील आनंदाचा सुवास वेडं बनवतो आहे. तुम्हीदेखील आनंदाचा सुवास बाहेरून येत असल्याचं अनुभवता. कधी कुणा स्त्रीच्या सहवासात तुम्हाला वाटतं की आनंद मिळाला. कधी बासरीच्या सूरात वाटतं की आनंद मिळाला. कधी जेवणाच्या रूचीत वाटतं की आनंद मिळाला. कधी पैशाच्या खणखणाटात वाटतं की आनंद मिळाला. कधी पदाच्या उक्तीत, अहंकारात वाटतं की आनंद मिळाला. मोठं जंगल आहे. प्रत्येक वृक्षावर तुम्ही डोकं आपटून घेतलं आहे, रक्तबंबाळ झाला आहा. कधी इथे, कधी तिथे. कधी इकडे, कधी तिकडे. शोध घेता अन् झलक मिळते. झलक अशामुळे मिळते की 'कस्तूरी कुंडली बसै...' जिथे कुठे जाल तिथे झलक मिळेल.

आता हे जरा अवघड आहे. जेव्हा तुम्हाला आढळतं की कुणा स्त्रीत आनंद मिळाला तेव्हा नेमकी तीच स्थिति असते जी कस्तूरी–मृगाची आहे. आनंद तुम्हाला स्वतःमुळेच मिळतो आहे. कारण उद्या तुमचंच मन बदलून जाईल. अन् या स्त्रीत आनंद नाही मिळणार. उद्या याच स्त्रीपासून तुम्ही दूर राहू पाहाल. आज सारं अर्पण करून टाकायला तयार होता. उद्या हिचा चेहरा पाहाणं अवघड होऊन बसेल! जर स्त्रीकडून आनंद मिळाला होता तर नेहमीच मिळाला असता, शाश्वत मिळाला असता. तेव्हा तुमच्या अंतर्यामातून कुठलासा सुवास उमटला होता अन् स्त्रीत त्याचं प्रतिबिंब पडलं होतं. तुमच्याच अंतर्यामातून सुवास उमटला होता अन् तुम्हाला तो स्त्रीतून उमटत असल्यासारखं वाटलं होतं. स्त्रीनं कदाचित् तुमच्या अंतर्यामी जे होतं त्याचाच प्रतिध्वनि उमटवला होता... कधी पैसा गोळा करण्यात, कधी अहंकाराच्या तृप्तीत, पद–प्रतिष्ठेत तुम्हाला सुवास आल्याचं अनुभवाला आलं.

मी ऐकलंय, एका जंगलात असं घडलं. एका कोल्ह्यानं एका सशाला पकडलं तो त्याला खाणारच होता. सकाळच्या न्याहारीचीच तयारी होती इतक्यात ससा म्हणाला, 'थांब! तू कोल्हाच आहेस याचा पुरावा काय?' इतिहासात असं कधी कुणा सशानं विचारलंच नव्हतं. कोल्ह्यालादेखील धक्काच बसला. त्याच्या मनातदेखील पहिल्यांदा विचार उमटला की गोष्ट तर बरोबर आहे... पुरावा काय आहे?' त्या सशान विचारलं की सर्टिफिकेट् कुठे आहे, दाखला कुठे आहे?' कोल्हा म्हणाला, 'तू थांब. मी आत्ता येतो.'

तो गेला जंगलाच्या राजापाशी, सिंहापाशी. अन् तो म्हणाला, एका

सशानं मला पेचात टाकलं आहे. मी त्याला खाणारच होतो इतक्यात तो म्हणाला, थांब ! सर्टिफिकिट कुठाय !

सिंहानं कपाळावर हात मारून घेतला ! अन् म्हणाला की माणसांचा हा रोग जंगलातही आला...! काल मी एका गाढवाला धरलं, ते गाढव म्हणालं की आधी पुरावा...दाखला कुठे आहे ! आधी मीदेखील उडालोच की आजवर कुणा गाढवानं विचारलं नाही...या गाढवाला काय झालं ?... ते माणसांच्या सत्संगात राहिलेलं होतं !

सिंह म्हणाला की मी लिहून देतो. त्यानं लिहून दिलं की हा कोल्हाच आहे !

कोल्हा गेला. मोठ्या आनंदानं. सर्टिफिकीट घेऊन ! ससा बसला होता ! कोल्ह्याला तर शंका होती की पळून जाईल, की सारी फसवणूक आहे. पण नाही, ससा बसला होता ! सशानं सर्टिफिकिट वाचलं, कोल्ह्याच्या हाती ते दिलं अन् त्यानं धूम ठोकली ! तो जवळच्याच बिळात अंतर्धान पावला ! कोल्हा सर्टिफिकीटाच्या देवाणघेवाणीत अडकला अन् दरम्यान तो निसटला ! कोल्हा खूप वैतागला. तो माघारी सिंहापाशी आला की, 'हा तर मोठा वैताग झाला. सर्टिफिकिट तर मिळालं पण तो ससा हातचा गेला. तुम्ही गाढवाबाबत काय केलं होतं?' सिंह म्हणाला की पाहा ! जेव्हा मला भूक लागलेली असते तेव्हा मी सर्टिफिकिटाची काळजी नाही करत, आधी मी खाऊन घेतो ! तेच पुरेसं सर्टिफिकिट आहे की मी सिंह आहे ! अन् जेव्हा मी उपाशी नसतो तेव्हा मी सर्टिफिकिटाची अजिबात फिकीर नाही करत ! मी ऐकतच नाही ! . . . पण हा रोग झपाट्यानं पसरतो आहे.

माणसात हा रोग मोठा जुना आहे. जनावरामधे कदाचित् आता पोचला असेल. रोग असा की तुम्ही दुसऱ्यांना विचारता की मी कोण आहे ? जेव्हा हजारो लोक जयजयकार करतात तेव्हा तुम्हाला सर्टिफिकिट मिळतं की तुम्ही काही आहा ! जेव्हा कुणी तुम्हाला उठवून सिंहासनावर बसवतं तेव्हा तुम्हाला दाखला मिळतो की तुम्ही काही आहा !... दुसऱ्यांकडून दाखला घ्यायची गरज आहे का ? दुसऱ्याला विचारणं आवश्यक आहे का की तुम्ही कोण आहा ?

पण तुम्ही नेहमी दुसऱ्यांना विचारता आहा. शाळेतून सर्टिफिकिट घेऊन आला आहा की तुम्ही मॅट्रिक आहा... की बी. ए. आहा की पी. एच. डी. आहा, सगळीकडून तुम्ही सर्टिफिकिटं गोळा केली आहेत की तुम्ही कोण आहा ?' कुठलाही दाखला तुम्हाला सांगू नाही शकणार की तुम्ही कोण आहा ? कारण दुसरे तुम्हाला कसं ओळखतील ?

सिंहदेखील कसा दाखला देऊ शकेल कोल्ह्याला की तू कोल्हाच आहेस ? जर



कुठला पुरावा असेल तर तो अंतर्यामी आहे. तुम्ही कोण आहा याबाबत जर कुठलीही सूचना मिळू शकते तर अंतर्यामातून मिळू शकते. तुम्ही दुसऱ्यांची दारं नका ठोठावू. तुम्ही स्वतःचंच दार उघडून घ्या. अन् तुम्हाला दुसऱ्यांच्या दारावर जी अस्पष्टशीही झलक मिळेल तीदेखील तुमच्या अंतर्यामीच्याच सुगंधाची आहे. दुसऱ्याच्या दारावर आदळून तुमचाच सुवास तुम्हाला येईल अन् तुम्ही समजाल की दुसऱ्यानं काही दिलं आहे.

या जगात कोणी कुणाला काही नाही देत. देऊ नाही शकत. स्त्री पुरुषाला सुख नाही देऊ शकत, पुरुष स्त्रीला सुख नाही देऊ शकत. पण एकमेकाच्या जवळपास उभं राहून आपल्याच सुवासाचा प्रतिसाद ऐकणं सोयीचं होतं. एकाकीपणानं तुम्ही खूप अस्वस्थ होता. जर तुम्हाला एखाद्या शून्य घरात सोडण्यात आलं तर तुम्ही मोठ्या संकटात सापडता. कारण तिथे कुणी दुसरा माणूस नाही ज्याच्याद्वारे तुम्ही आपला सुवास परत मिळवू शकावं. म्हणून माणूस गर्दीकडे जातो—क्लब, समाज, समुदाय, मित्र, कुटुंब.

तुम्ही नेहमी दुसऱ्याला शोधता. कारण दुसऱ्याविना प्रतिध्वनि कसा ठाऊक होईल. तुम्ही धावत राहाता. बऱ्याच जागी तुम्हाला झलक मिळते. ती सारी झलक खोटी आहे—स्रोताच्या दृष्टीनं खोटी. तुम्हाला वाटतं ती बाहेरून मिळते आहे. म्हणून तुम्ही बाह्यावर अवलंबून राहायला लागता अन् जितकं तुम्ही बाह्यावर अवलंबून राहायला लागता तितकीच अंतर्यामीची जागृति हरवून जाते.

ओळखा. जेव्हा स्त्री—संभोगात कधी तुम्हाला सुखाचा कुठला क्षण मिळतो तेव्हा काय होतं ? होतं इतकंच की स्त्री—संभोगाच्या क्षणी विचार बंद होऊन जातात. विचार बंद होऊन जातात, अंतर्यामी ध्यानाची धुन वाजायला लागते. मार्ग खुला होतो—कस्तूरी बाहेर येते. क्षणभर तुम्ही सुख अनुभवता. क्षणभर गवाक्ष उघडतं, पुन्हा बंद होऊन जातं.

जिथे कुठे म्हणून कुणी सतार वाजवत असेल अन् तुम्ही बसत असाल, लीन होऊन जात असाल—तुम्ही लीन होताक्षणीच सुगंध येऊ लागतो. तो सुगंध सतारीतून येत नाहीये, तो तुमच्या लीनतेतून येतो आहे. तल्लीनताच तर ध्यान आहे.

तुम्ही जेवता. चविष्ट जेवण आहे. तुम्ही मोठ्या आवडीनं जेवता आहा. तुम्ही इतके तल्लीन होऊन जेवता की जेवणच ध्यान बनून जातं. उपनिषदकार ऋषींनी त्याच क्षणात तर म्हटलं आहे की अन्न ब्रह्म आहे. अन्नातूनही इतका ध्वनि उमटला असेल की ब्रह्मासारखं वाटलं. होतं काय ?

असं समजा की तुम्ही जेवता आहा. मोठं चवीचं जेवण आहे. तुम्ही अगदी तल्लीन आहा. खूप सुख मिळतं आहे. चव कणकणात भरून जाते आहे. तेव्हाच

कुणी बातमी घेऊन येतो की बाहेर पोलिस उभे आहेत अन् मिसाखाली तुम्हाला अटक करण्यात येत आहे. तत्क्षणी चव हरवून गेली. जेवण आत्तादेखील तेच आहे. पण लीनता तुटून गेली. जेवण तेच आहे. जीभ तीच आहे. शरीरात आतादेखील तेच रस काम करताहेत. पण लीनता तुटून गेली. आता जेवणाला कुठली चव नाही. जेवण बेचव होऊन गेलं. आता अन्नात मीठ आहे की नाही तुम्हाला उमगणार नाही.

अचानक काय बदलून गेलं ? सारं तर तेच आहे. अन् मग एक माणूस आत येतो. तो म्हणतो की घाबरू नका. नुसती थट्टा केली होती. कोणी पोलिस वगैरे नाही आलेले. मिसाखाली अटक वगैरे नाही झालेली...पुन्हा लीनता आली. जे जेवण बेचव होऊन गेलं होतं, मोठं अंतर निर्माण झालं होतं ते पुन्हा चवीचं बनलं. पुन्हा तुम्ही मग्न आहा !

तुम्ही दान देता. तुम्ही भोग घेता. तुम्हीच आधी जेवणात रस निर्माण करता लीनतेनं, मग तुम्हीच चव घेता. तुम्ही स्त्रीत वा पुरुषात आपल्या कामनेद्वारे लक्ष केन्द्रित करता, मग आपलाच सूर ऐकता.

'कस्तूरी कुंडल बसै...'

जिथे कुठे तुम्हाला आनंद मिळाला असेल, आठव ठेवा की तो तुम्हीच निर्माण केला असेल. कारण दुसरा कुठला उपाय नाहीये. पैशात निर्माण केला असेल तर पैशात आनंद मिळू लागेल. पदात निर्माण केला असेल तर पदात आनंद मिळू लागेल. ज्या कुठल्या गोष्टीत निर्माण कराल त्यात आनंद मिळू लागेल. आनंद तुमचा स्वभाव आहे. तो तुमच्या नाभीतच दडला आहे. अन् तुम्ही धुंदीत धावता आहा. अन् तिथे शोधता आहा, जिथे तो नाहीये. अन् जिथे तो आहे त्याला तुमची दृष्टि अगदी मुकली आहे.

'तेरा जन एकाध है कोई--'

कोटचावधीत कुणी एखादा अंतर्यामाकडे वळतो. कोटचावधीत कुणी एखादा हे रहस्य समजू शकतो की जे मला बाहेर मिळतं आहे ते माझ्या अंतर्यामी आहे. या रहस्याची चावी हाती येताच, जीवनात क्रांति घडून जाते. तुमच्या हाती स्वर्गाचं द्वार आलं पहिल्यांदा. आता कुठे शोधायची गरज नाही राहिली. आता तर जेव्हा कधी इच्छिलं, सुवास अंतर्यामी आहे; स्वर्ग अंतर्यामी आहे--

'जब जरा गर्दन झुकाई देख ली
दिल के आईने में है तस्वीरे-यार।'

आता बस् मान वाकवण्याची गोष्ट राहिली. हळूहळू तर मान वाकवण्याचीदेखील गोष्ट नाही राहात. तुम्हीच आहा, मानही काय वाकवायची आहे ! जिथे राहिला, जसे राहिला तिथे आनंद दरवळत राहील. जिथे राहिला, जसे राहिला,



सोयीत राहिला की गैरसोयीत राहिला, निरोगी होता की आजारी होता, गरीब होता की श्रीमंत होता, तरुण होता की म्हातारे होता, जन्मत होता की मरत होता-- कुठला फरक नाही पडत.

तुम्हीच आहा तो परम स्वर्ग. आता बाहेर काहीही होत राहो ते सारं बाहेर आहे अन् अंतर्यामी अनाहत संगीत निनादतं आहे. अन् अंतर्यामी त्या अंतर्यामीच्या महासुखात थोडीशीही भेग नाही पडत, कुठलं विघ्न नाही येत. कारण जे बाहेर आहे ते बाहेर आहे. अन् ते अंतर्यामी पोचण्याचा कुठला मार्ग नाही. एकदा तुम्हाला आपलं अंतर्यामीचं मंदिर मिळालं अन् एकदा तुम्ही मार्ग ओळखला की मग तुमची दिशाभूल करण्याचा कुठला उपाय नाही. कारण कुणी दिशाभूल करतही नव्हतं. तुम्ही स्वतःच भटकंती करत होता. कारण तुम्हाला वाटत होतं की सुवास बाहेरून येतो आहे. अन सुवास तुमच्या नाभीत दडलेला होता.

'तेरा जन एकाध है कोई--'

कोटचावधीत कुणी एखादा अंतर्यामीची ही गोष्ट ओळखू शकतो. अडचण कुठली आहे? . . .शोधतात तर सारे, मिळवूही सारे इच्छितात. मग मिळवू का नाही शकत? कुठे अडचण आहे? कुठे मार्गात भिंत येते?

'काम क्रोध अरू लोभ विवर्जित, हरिपद चीन्है सोई--'

कबीर म्हणतो आहे की काम, क्रोध अन् लोभ या तिन्हींचा अडथळा आहे. यांच्यामुळेच ओळखणं अवघड होऊन बसतं, यांच्यामुळेच हरिपद ओळखणं अवघड -- जवळजवळ अशक्य होऊन जातं. या तिन्हींना आपण समजून घेण्याचा प्रयत्न करू.

काम, क्रोध, लोभ--

काम म्हणजे जे आपल्यापाशी आहे त्याहून जास्त मिळवण्याची आकांक्षा. जे मिळालं आहे त्यानं तृप्त न् होणं काम आहे. जे आहे, त्याबाबत असंतोष काम आहे. म्हणून मोक्षाची कामनादेखील कामनाच आहे. परमात्मा मिळवण्याची इच्छादेखील काम आहे. पैसा मिळवण्याची इच्छा तर काम आहेच; स्त्री मिळवण्याची, पुरुष मिळवण्याची इच्छा तर काम आहेच. परमात्मा मिळवण्याची इच्छा, मोक्ष मिळवण्याची इच्छादेखील काम आहे.

कामाचा अर्थ इतकाच आहे की जे आहे, तितकं पुरेसं नाही. अन् अकामाचा अर्थ आहे जे आहे ते पुरेशाहून जास्त आहे, जे आहे ते परम तृप्ति देतं आहे, जे आहे ते संतोष देतं आहे त्यात आम्ही खूष नाही आहोत तर आम्ही आनंदितदेखील आहो. जे मिळालं आहे त्याबाबत आम्ही आभारी आहो, कृतज्ञ आहो. मग काम विसर्जित होऊन जातो.

म्हणून लक्षात ठेवा, दोन प्रकारचे कामी लोक आहेत. संसारी अन्

धार्मिक. संसारी कामी माणूस बाजारात बसला आहे. तो पैसा गोळा करतो आहे, पदप्रतिष्ठा साठवतो आहे, घर मोठ्याहून मोठं बनवत चालला आहे. अन् एक धार्मिक कामी आहे. तो संन्याशी बनला आहे, मुनि बनला आहे. मंदिरात बसला आहे, आश्रमात बसला आहे. पण तोदेखील कामी आहे. त्याच्या कामनेचा विषय बदलून गेला आहे, पण कामना नाही बदलली. काल तो पैसा इच्छित होता. आता तो ब्रह्म इच्छितो. इच्छा उरलेली आहे.

अन् इच्छा काम आहे. तुम्ही काय इच्छिता यानं कुठला फरक नाही पडत. जोवर तुम्ही इच्छिता तोवर ताण राहील. अन् जोवर ताण राहील तोवर अडथळा राहील. जोवर तुम्ही मागत राहाल तोवर तुमची दृष्टि बाहेर लागून राहील. जोवर तुम्ही इच्छेनं भरून राहाल तोवर तुम्ही भविष्यकाळानं भरून राहाल. तुमचं मन धावत राहील उद्याकडे. अंतर्यामी कसे जाल ? अंतर्यामी जाणं तर आज अन् आत्ता होईल. बाहेर जाणारं मन नेहमी उद्या येणाऱ्या भविष्यकाळात आंदोलित होत राहील, डगमगत राहील.

काम भविष्यकाळ निर्माण करतो. कामनेतून भविष्यकाळ निर्माण होतो. अन् जो माणूस निष्काम आहे तो आत्ता अन् इथेच जगतो. त्याच्यासाठी कुठलं भविष्य नाहीये. हा क्षण पुरेसा आहे. काय उणीव आहे या क्षणात ? सारं पूर्ण आहे. तुम्ही पूर्णच्या पूर्ण आहा, कणभरही उणीव नाहीये. पण कामना निर्माण झाली तर कामनेनं उणीव निर्माण होते.

हे गणित नीट समजून घ्या. जितकी मोठी कामना, तितकी मोठी उणीव. जितकं मागाल तितके मोठे भिकारी राहाल.

मी एका घरी पाहुणा होतो कलकत्त्यात. एयरपोर्टवरून यजमान मला घेऊन निघाले तर खूप उदास होते. मी विचारलं, 'काय झालं ?' म्हणाले की, 'खूप नुकसान झालं आहे.' त्यांची पत्नी, जी मागे बसली होती...ती म्हणाली, 'यांचं नका ऐकू ! आपण तर जाणताच की नुकसान अजिबात नाही झालेलं, फायदा झाला आहे...' तर मी थोडा वैतागलो की भानगड काय आहे ! मी म्हटलं की, 'सविस्तर सांगा' तर ती म्हणाली की, 'यांना कुठल्याशा धंद्यात दहा लाख मिळण्याची आशा होती, पाचच लाख मिळाले ! . . .हे म्हणतात, पाच लाखाचं नुकसान झालं. अन् म्हणून खूप त्रस्त आहेत. हे रात्री झोपू नाही शकत. अन् म्हणूनच माझी इच्छा होती की आपण यावं अन् यांना थोडा आठव करून द्यावा की पाच लाखाचा फायदा झाला आहे.

कामना दहाची असेल अन् पाचच मिळाले तर पाचाचं तर नुकसान झालं ! जर कामना पन्नासाची असती तर अजून मोठं नुकसान झालं असतं ! जर कामना कोटीची असती तर भिकारीच झालो असतो अन् दिवाळंच निघालं असतं !



जितकी मोठी कामना होत जाते तितकं मोठं भिकारीपण वाढत जातं. म्हणून सम्राटांहून मोठे भिकारी तुम्हाला कुठे आढळू नाही शकणार अन् पैसेवाल्यांहून मोठे दरिद्री शोधणं अवघड आहे ! त्यांच्यापाशी काय आहे त्याची मोजणी नका करू.कारण त्याची मोजणी ते स्वतःच नाही करत, मग तुम्ही का करावी ! त्यांच्यापाशी जे नाहीये त्याचा हिशेब करा तेव्हा तुम्हाला उमगेल. इथेच चूक होते आहे. तुम्ही पाहाता पैसेवाला. . .तर तुम्ही याचा हिशेब करता जे जे त्याच्यापाशी आहे– किती मोठं घर, किती मोठी गाडी, किती मोठी जमीन. तुम्ही याचा हिशेब करता आहा. तुम्ही म्हणता आहा, या माणसापाशी किती आहे. तो माणूस याचा हिशेब करता नाहीये. तो त्याचा हिशेब करतो आहे, जे असायला हवं अन जे नाहीये. तुम्ही असूयेनं मरता आहा की जर इतकं आपल्यापाशी असतं ! अन तो माणूस आपल्या हावेनं मरतो आहे कारण हे तर काहीच नाहीये !

स्वप्नं कधी पूर्ण नाही होत. कारण जर पूर्णही झाली तरीदेखील स्वप्नं मोठी लवचिक असतात. जोवर ती पूर्ण होतात. तोवर ती विस्तारून अजून मोठी होतात. स्वप्नं तर मुलं रबरी फुग्याशी खेळतात तशी आहेत. तुम्ही फुगवत जाता. ती मोठी होत जातात. काही आणखी नाही करावं लागत, नुसती हवा भरावी लागते. नुसती थोडी हवा अजून भरली की फुगा मोठा होतो, अजून मोठा होत जातो. कामना हवा भरण्याहून जास्त नाहीये. कुठल्या कामनेसाठी काही करावं नाही लागत.आराम खुर्चीवर बसून तुम्ही जितकी दिवास्वप्नं पाहण्याची इच्छा कराल तितकं पाहू शकता. अन् मुलांचे फुगे तर फुटूनही जातात, जर जास्त हवा भरली गेली तर. पण कामनेचे फुगे कधी नाही फुटत ! कारण ते असले तर फुटतील ना ! फुगा कमीत कमी 'काही' तर आहे. कबूल आहे की खूप पातळसं रबर आहे अन् आत नुसती गरम हवा आहे. पण स्वप्नाच्या फुग्यात तेवढं पातळ रबरही नाही ! तो हवाच हवा आहे ! त्याला तुम्ही फुगवत जाता. हे आकाश लहान आहे तुमच्या स्वप्नापेक्षा ! त्याची कुठली सीमा नाही. जगात दोन गोष्टी असीम आहेत. एक स्वप्न अन् दुसरा ब्रह्म ! बस्, दोन गोष्टी असीम आहेत ! त्यापैकी एक आहे अन् एक अजिबात नाहीये !

मग स्वप्न जितकं मोठं होतं त्याच्याशी तुम्ही जे तुमच्यापाशी आहे त्याची तुलना करता. मोठी अतृप्ति निर्माण होते. तितका असंतोष निर्माण होतो. कुणी तुम्हाला गरीब बनवत नाहीये. तुम्हीच स्वतःला गरीब बनवत चालला आहा. ज्यादिवशी बुद्धाला अन् महावीराला हे उमगलं, ते लगेच राजवाडा सोडून सडकेवर उभे झाले. राजवाडा नाही सोडला, तर ज्याच्यामुळे गरीबाहून गरीब होत चालले होते ते स्वप्न सोडून दिलं. म्हणून जगात मोठी विलक्षण घटना

घडते की सम्राट दीन राहून जातात. अन् कधी कधी रस्त्यावरच्या भिकाऱ्यानं असा गौरव प्राप्त केला आहे की त्याचा महिमा वर्णिला नाही जाऊ शकत.

रहस्य कुठे आहे? चावी कुठे आहे?

जे तुमच्यापाशी आहे त्यात जो तृप्त आहे, ज्याची वासना कणभरही भविष्यकाळाकडे नाही जात, ज्याला वर्तमानकाळ पुरेसा मिळाला–पण पुरेसा शब्द बरोबर नाहीये–पुरेशाहून जास्त मिळाला. कारण पुरेशात थोडं कमी वाटतं. बस् पुरेसं? असं वाटतं की काही अजून उरलं आहे...तेव्हा जे आहे त्यात ज्याला पुरेसंच नाही तर पुरेशाहून जास्त मिळालं, तृप्ति मिळाली, संतोष मिळाला... अन् इतकंच नाही की तो खूष आहे तर तो कृतज्ञ आहे, कृतकृत्य आहे. जे मिळालं आहे त्याबाबत त्याच्या हृदयी मोठी गहन कृतज्ञता आहे .. तर कामना तुटून जाते. संतोष कामना संपवून टाकतो. असंतोष कामनेच्या अग्नीत तूपासारखा वाढत जातो.

संतुष्ट व्हायला शिका, तर कामनेची पहिली बाधा गळून पडेल. जर कामना टिकून राहिली तर भविष्यकाळाचं जाळं टिकून राहातं. अन् ते जाळं मोठं आहे. अन् वर्तमानकाळाचा क्षण खूप छोटा आहे. त्या जाळ्यात तो कुठे हरवून जाईल, तुम्हाला ठावही नाही लागणार. वर्तमानकाळाचा क्षण तर असा आहे जसा वाळूचा एक कण. अन् भविष्यकाळाचं जाळं असं आहे जशी साऱ्या सागरांच्या काठची वाळू. वर्तमानकाळाचा कण त्या वाळूत तुम्ही कुठे हरवून बसाल, ठावच नाही लागणार. अन् तेच द्वार आहे. अन् त्याच्याखेरिज कुठलं द्वार नाहीये. तिथूनच कुणी मंदिरात प्रवेशतो. कारण तिथेच तुम्ही आहा. तिथेच वृक्ष आहेत. तिथेच आकाश आहे. तिथेच चंद्रतारे आहेत. तिथेच परमात्मा आहे.

वर्तमान काळाचा क्षण एकमेव अस्तित्व आहे. भविष्यकाळ तर कल्पनेचं जाळं आहे. ती तर डोळे उघडे ठेवून स्वप्न पाहाण्याची पद्धत आहे–दिवास्वप्न!

जर तुमची कामना भविष्यकाळाच्या दिशेनं सरसावत जात असेल तर एक अडथळा दुसऱ्या अडथळ्याला मदत करतो. ज्या माणसाची कामना भविष्यकाळात असेल त्याचा लोभ भूतकाळात असेल. लोभ भूतकाळ आहे अन् कामना, काम भविष्यकाळ आहे. लोभाचा अर्थ आहे, जे आहे ते जोरानं धरून ठेवा. कामाचा अर्थ आहे, जे नाहीये त्याची मागणी करत चला अन् लोभाचा अर्थ आहे, जे तुमच्यापाशी आहे ते घट्ट धरून ठेवा. ते कुठे हरवून जाऊ नये. त्यातून कणभर कमी होऊ नये.

आता ही मोठी गंमतीची गोष्ट आहे की त्यानं तुम्हाला कुठलं सुख मिळत नाहीये. त्यानं तुम्ही तृप्त नाही आहात. संतोषाची तर तुम्ही कामना



करता आहा. कधी भविष्यकाळात कुठला स्वर्ग मिळेल...पण तुम्ही तिला जोरात धरून आहात.

माणूस भूतकाळाला धरून ठवतो अन् जे जे त्यानं भूतकाळात मिळवलं आहे–पैसा, पद, ज्ञान, त्याग जे काही–ते सांभाळून ठेवतो की कुठे हे हरवून जाऊ नये. डोळे भविष्यकाळाकडे लागून राहातात अन् पाय भूतकाळात रुतून असतात. दोन्ही हातांनी तर भूतकाळाला धरून असता अन् दोन्ही डोळ्यांनी भविष्य-काळाचं स्वप्न पाहात राहाता. अन् या दोहोंच्या दरम्यान एक क्षण आहे, जिथे अस्तित्व नेहमीच समाधीत लीन आहे, जिथे अस्तित्व क्षणभरही कप पावलं नाहीये, जिथे निष्कंप चैतन्याची ज्योत तेवते आहे, जिथे मंदिराचं द्वार खुलं आहे.

ते द्वार अरूंद आहे.

येशूनं आपल्या शिष्यांना म्हटलं आहे, 'नॅरो इज माय गेट–माझं द्वार अरूंद आहे...स्ट्रेट इज दि वे, बट नॅरो इज माय गेट–मार्ग तर सरळ स्पष्ट आहे पण द्वार खूप अरूंद आहे.' तेच तर कबीर म्हणतो, 'प्रेम की गली अति सांकरी, तामे दो न समाय–खूप अरुद आहे गल्ली. त्यात दोघंही बरोबर नाही जाऊ शकणार.'

येशूनं म्हटलं आहे, सुईच्या छिद्रातून उट निघून जाईल पण पैसेवाला स्वर्गाच्या द्वारातून नाही जाऊ शकणार! शेवटी पैसेवाल्यावर अता काय राग आहे?...पैसेवाल्याचा अर्थ ज्यानं भूतकाळाला धरून ठेवलं आहे, लोभाला...

लोभ अन् काम एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. एक भूतकाळाकडे पाहातो आहे की जे आहे ते हरवून जाऊ नये. दिडकी–दिडकी धरून आहे. अन् काम भविष्याकडे पाहातो आहे की जे आहे त्याहून जास्त असायला हव. या दोहोंच्या मधे ओढाताण होणारे तुम्ही आहा...जर तुमचं जीवन अगदी संकटात पडलेलं आहे तर कुठलं आश्चर्य नाही. जर दोन अभावांमधे तुमची अशी ओढाताण होते आहे तर आश्चर्य नाहीये. भूतकाळ निघून गेला. त्यातून तुम्ही जे काही गोळा करून घेतलं आहे, कचरा आहे. भविष्यकाळ आला नाही, तुम्ही जो काही विचार करता आहा, केवळ स्वप्न आहे. त्या दोहोंच्या मधे तुमची ओढाताण होते आहे, तुमची दुर्दशा होते आहे. मग तुम्ही म्हणता की मोठी काळजी आहे, मोठा ताप आहे. असणारच. आश्चर्य आहे की तुम्ही जिवंत कसे आहा!

मानसशास्त्रज्ञ जितकं अध्ययन करतात तितकेच ते चकित होतात. आधी तर, पन्नास वर्षापूर्वी मानसशास्त्रज्ञ लिहित होते की इतके जास्त लोक वेडे होतात, का? आता ते लिहितात की इतके लोक वेडे नाही होत, थोडेच वेडे होतात. उरलेले तर नाही होत, का? कारण स्थिति तर अशी आहे की

सार्‍यांनी वेडं व्हायला हवं... वेडे आहेतच ! कमीजास्त प्रमाणाचा फरक आहे. कुणी स्वतःला थोडं जास्त सावरून आहे, तो कमी वेडा वाटतो. पण अंतर्यामी सारं वेडेपण धुमसतं आहे. केव्हा स्फोट होईल, कुणीही नाही जाणत. कुठल्याही क्षणी होऊ शकतो. तरी बरं आहे कीं मृत्यू लौकर येतो. थोडा विचार करा की जीवन जर दोनशे वर्षांचं असेल तर तुम्हाला एकही माणूस असा नाही आढळणार जो वेडा झाल्याविना मरण पावेल! जीवन थोडं आहे म्हणून हे नाही होत.

जर जीवन हजार वर्षांचं असेल तर पृथ्वी अगदी वेड्यांनी भरून जाईल. मग वेड्यांची इस्पितळं बनवण्याची गरज असणार नाही, बुद्धांची इस्पितळं बनवावी लागतील ! काही लोक जे ठीक स्थितित आहेत त्यांना वाचवावं लागेल की यांना एक भिंत बनवून आत बसवून टाका. नाही तर हे वेडे मारून टाकतील ! भिंतीबाहेर वेड्यांची इस्पितळं, भिंतीआड बुद्धांचं इस्पितळ बनवावं लागेल. वय कमी आहे, पटकन् संपून जातं. नाही तर जर तुम्ही जसे आहा तसेच वाढत गेला तर तुम्ही कल्पना करू शकता की शेवट काय होईल. तुम्ही वेडे होण्याआधी मृत्यू येतो, विश्रांति देऊन टाकतो ! मृत्यूची मोठी कृपा आहे !

काम अन् लोभ— काम तर सतोषानं निघून जातो. लोभ कसा जाईल ? नुसता संतोष पुरेसा नाहीये. लोभाचा अर्थ आहे तुम्ही धरता, तुमची देण्याची क्षमता हरवून गेली आहे तुम्ही वाटू नाही शकत... अन् जो माणूस वाटू नाही शकत तो आपल्या वस्तूचा मालक नाहीये, गुलाम आहे ! जेव्हा तुम्ही देता तेव्हा पहिल्यांदा तुम्ही मालक बनता. तुम्ही ज्या वस्तू देऊन टाकल्या त्यांचेच तुम्ही मालक आहा. देण्यानं पहिल्यांदा मालकी ठाऊक होते. तोच देऊ शकतो, जो मालक आहे. जो मालकच नाहीये तो कसा देऊ शकेल ? म्हणून कंजूष माणसाहून जास्त कुरूप या जगात कुणी दुसरं व्यक्तिमत्त्व नाहीये. कंजूषपण सर्वात मोठं कुरुपपण आहे. जीवनाचं सारं सौंदर्य हरवून जातं.

कंजूष माणसाचा चेहरा पाहा.त्याच्या जीवनाची ठेवण पाहा, त्यात तुम्हाला कुठे प्रेमाचा मागमूसही नाही आढळणार. कारण कंजूष प्रेम नाही करू शकत. कारण प्रेमात धोका आहे. वाटावं लागेल, द्यावं लागेल. प्रेमात हा धोका आहे की दुसरा जवळ येईल तेव्हा काही ना काही घेऊन जाईल.

मी एका घरात रहात होतो तिथल्या यजमानांना मी कधी नाही पाहिलं की ते आपल्या मुलांशी बोलताहेत वा आपल्या बायकोपाशी बसले आहेत. ते घरात आले की मुलं थरथर कापायची, बायको घाबरायची. अन् बायको घाबरत असेल तर जाणा की कुठला खास मामला आहे ! कारण सर्वसाधारणपणे बायका घाबरत नाहीत ! कधी तरी असं होतं, शंभरात एकाद्या वेळी की बायकोनं घाबरावं ! ... बायको घाबरायची. नोकर घाबरायचे. अन् त्यांना मी असं कधी



नाही पाहिलं की रस्त्यावरून चालले आहेत तर इकडे–तिकडे पाहाताहेत. ते अगदी सरळ चालत राहायचे. एकदम निघून जायचे, तीरासारखे.

मी त्यांना विचारलं की काय भानगड आहे ? तर ते म्हणाले की जर थोडंसंही हसून पत्नीशी बोललं तर ती म्हणते, ‘अमका दागिना आणून द्या... हे करा ..’ ! हसून बोललं की गेलो ! तेव्हा चेहरा कडक ठेवावा लागतो ! जर मुलाची थोडीशी पाठ थोपटली तर तो खिशात हात घालतो ! जर नोकराकडे नुसतं पाहिलंही तर तो टपूनच असतो की पगार वाढवा !

पण या माणसाच्या जीवनाची कल्पना करा. पैसा तर हा वाचवून घेईल, पण इतर सारं हरवून जाईल. याच्या जीवनात कुठला सुखाचा क्षण नाही असू शकत. कारण जो आपल्या मुलाची पाठ थोपटायला देखोल घाबरत असेल, जो बायकोपाशी बसून स्मित करायला घाबरत असेल तो माणूस नाहीये तर एक प्रकारचा दगड बनला ! याचं हृदय धडधडणं हळूहळू बंद होऊन जाईल ! नुसती फुप्फुसं हवा बाहेर टाकत राहातील ! हृदयाची धडधड हरवून जाईल ! याच्या जीवनात जे काही संवेदनशील आहे ते सारं नाहीसं होऊन जाईल. कारण हा घाबरलेला आहे, हा कंजूष आहे, हा भयभीत आहे. यानं संपत्तीलाच सर्वस्व मानलं आहे. हा संपत्तीची राखण करेल पण तिचा मालक नाहीये.फार तर पहारेकरी असू शकतो ! मालकी तर तेव्हाच असते जेव्हा तुम्ही वाटू शकता. अन् द्यायची कला शिकून घेणं या जगात सर्वात मोठी कला आहे. कारण त्याच दारानं सारं काही येतं. जो देतो त्याला मिळतं. जो लुटवतो त्याच्यावर बरसात होते. कबीरानं म्हटलं आहे की नावेत पाणी साचलं तर तुम्ही काय करता ?... ‘दोनों हाथ उलीचिये।’ असंच जीवनात जे तुम्हाला मिळेल ते तुम्ही दोन्ही हातांनी लुटवा.

येशूनं म्हटलं आहे की, ‘जो वाचवेल तो हरवून बसेल. अन् जो हरवायला तयार आहे त्याच्याकडून कुणीही हिरावू शकणार नाही.’ या मोठ्या विपरीत गोष्टी आहेत. कारण आपल्याला तर वाटतं की जितकं वाचवाल तितकं वाचेल, वाटाल तर हरवून जाईल. पण मग तुमच्या जीवनात तुम्हाला जीवनाच्या रहस्याची कुठलीही झलक नाही मिळाली. तुम्ही द्या अन् पाहा.

दान लोभाच्या अडथळ्याला पाडून टाकतं, संतोष कामाच्या अडथळ्याला पाडून टाकतो. दानाचा अर्थ इतकाच नाही की तुम्ही कुणाला पैसा देऊन टाकावा ! दानाचा अर्थ आहे, देण्याचा भाव. एक स्मितदेखील दिलं जाऊ शकतं. काही खर्च नाही लागत. पण कंजूष त्यालादेखील घाबरतो. कुणाकडे हसून पाहायला काय खर्च लागतो ? थोडाही खर्च नाहीये. पण खर्चाची शक्यता सुरू होऊन जाते. भीति आहे, भय आहे. कंजूष असा जगतो जणु वैर्‍यांमध्ये राहातो आहे.

सगळीकडे वैरी आहेत अन् प्रत्येक गोष्टीनं तो भयभीत आहे कंजूष भयानं थरथर कापत राहातो. सगळीकडे चोर आहेत, डाकू आहेत, लुटारू आहेत सगळीकडे बेईमान आहेत अन् साऱ्यांची दृष्टि त्याच्यावरच आहे की त्याच्या वस्तू हिरावून घ्याव्यात!

केवळ दानी माणूस अभय होऊ शकतो अन् दानाचा अर्थ बहु–आयामी (मल्टि डायमेन्शनल्) आहे. रस्त्यावर कुणी पडला आहे. तुम्ही हात धरून त्याला उठवता. मग तुम्ही आपल्या मार्गानं निघून जाता, तो आपल्या मार्गानं निघून जातो पण तुम्ही थोडीशी जीवनऊर्जा वाटली. तुम्ही एक कोमेजलेलं रोप पाहाता अन् तांब्याभर पाणी आणून घालता तुम्ही दिलं, तुम्ही जीवन–ऊर्जा वाटली. तुम्ही एका रोगी माणसापाशी जाता. एखादं फूल त्याच्या बिछान्यावर ठेवून येता. तुम्ही जीवनऊर्जा वाटली, तुम्ही जीवन दिलं. अन् खूप वेळा असं होतं की औषध जे काम नाही करत ते कुणा मित्रानं आणलेलं एक इवलंस फूल करून जात. कुणी अजूनही प्रेम करतं ही गोष्टी जितकी संजीवन देणारी ठरते तितकं कुठलं औषध नाही ठरू शकत. अन् कुणी अजूनही उत्सुक आहे... जेव्हा कुणी मृत्यूशय्येवर असतो तेव्हा कुणी येऊन कुशल–क्षेमही विचारणं खूप उपयोगाचं होऊन जातं. मग शक्ति जागी होते, आत्मविश्वास दाटतो. तो माणूस मृत्यूविरुद्ध उभा ठाकतो की सारी नाती तुटून नाही गेलेली. जीवनात अजूनही काही खुंट्या रोवलेल्या आहेत. कुणी वाट पाहातं आहे, कुणी प्रेम करतं आहे.

एक छोटंसं फूल, एक प्रेमानं भिजलेला शब्द कुणाच्या जीवनाच्या दिशेत क्रांति घडवून आणतो. कुणाचं जीवन कोसळू नाही देत. एक शुभाशीर्वाद प्राणांमधे नवी ज्योत उजळवून जातो.

काही पैसा वाटण्याची गोष्ट नाहीये. पैसा तर वाटण्याच्या दृष्टीनं निकृष्ट-तम आहे. ज्याच्यापाशी काही नसेल त्यानं पैसा वाटावा.

एक कोटयाधिश एकदा मला भेटायला आला. खूपसे पैसे आणून त्यानं माझ्या पायावर ठेवले. तो मोठा विलक्षण माणूस होता. नंतर मला तसा विल-क्षण माणूस साऱ्या देशात हिंडूनही नाही भेटला अन् मोठी आश्चर्याची गोष्ट अशी की तो एक सट्टेबाज होता, ज्यांना लोक वाईट समजतात. जीवन मोठं विलक्षण आहे. इथे कधी कधी वाईट स्थितीत दडलेले साधू आढळतात अन् कधी कधी साधूंच्या वेशात सैतानाखेरिज आणखी कुणीही नाही असत. जीवन मोठं रहस्यमय आहे. म्हणून तुम्ही वरून ओळखू नका. जोवर अंतर्यामी नाही पोचत तोवर निर्णय नका घेऊ...त्या सट्टेबाजानं बरेचसे पैसे आणून माझ्या पायावर ठेवले. मी म्हटलं, 'आत्ता मला गरज नाहीये. जेव्हा गरज असेल तेव्हा मी तुमच्याकडून घेईन.' त्या सट्टेबाजाच्या डोळ्यातून आसवं वाहू लागली. तो



म्हणाला, 'आपण असं म्हणता. पण तेव्हा माझ्यापाशी असतील की नाही–मी सट्टेबाज आहे–आज आहेत, उद्या नाहीयेत. म्हणून मी उद्याचं कुठलं वचन नाही देऊ शकत. मी सट्टेबाज आहे. मी तर आजच जगतो.' अन् मग तो म्हणाला की, 'आपण जर यांचा अव्हेर कराल तर आपण मला मोठं दुःख द्याल.' मी म्हटलं, 'म्हणजे?' तो म्हणाला की, 'मी अगदी गरीब माणूस आहे. पैशां-खेरिज माझ्यापाशी काहीही नाही'...!

मला याहून मोलाचे शब्द सांगणारा कुणी माणूस पुन्हा नाही भेटला. तो माणूस म्हणाला की मी खूप गरीब माणूस आहे. माझ्यापाशी पैशांखेरिज अजून काहीही नाही! अन् जर आपण माझ्या पैशांचा अव्हेर केलात तर आपण मला अव्हेरलत कारण माझ्यापाशी आणखी काहीही नाहीये जे मी भेट देऊ शकेन.

तेव्हा पैसा तर सर्वात गरीब माणूस वाटतो. तो तर निम्न आहे. त्याचं कुठलं मोठं मोल नाहीये. एक स्मित कसं मोजाल की किती रुपयांचं आहे! एक प्रेमानं ओथंबलेला शब्द कसा मोजाल की किती कॅरेटचा आहे!

अमूल्य आहे तुमच्यापाशी द्यायला. अन् रहस्य असं आहे की तुम्ही जितकं देता तितकं तुमच्यापाशी वाढतं. जितकं तुम्ही वाटता तितकं नवं तुमच्या अंतर्यामी उमटतं. कारण तुमच्या अंतर्यामी परमात्मा दडला आहे. तुम्ही त्याला वाटून–वाटून ही नाही वाटू शकणार. तुम्ही स्वतःच्याच हातांनी कंजूष बनला आहा. [तुम्ही देत जाल अन् तुम्हाला आढळेल की ताजं निर्माण होतं आहे. तुम्ही जितकं द्याल तितकं वाढेल. अन् जो माणूस द्यायची कला शिकून घेतो त्या माणसाची लोभाची भिंत पडून जाते.]

लोभ अन् काम यांच्या दरम्यान क्रोध आहे. क्रोध मोठा महत्त्वाचा आहे. समजून घेण्याजोगा आहे कारण या दोहोंहून जास्त गुंतागुंतीचा आहे, जटिल आहे.

क्रोध काय आहे?

जर तुमच्या कामनेत कुणी अडथळा आणला तर क्रोध येतो. कबीरानं बरो-बर सांगितलं आहे की, 'काम, क्रोध अन् लोभ.' त्यानं बरोबर ओळीनं शब्द ठेवले आहेत. क्रोध मधे आहे, सेतू आहे.

तुम्ही एखाद्या स्त्रीच्या प्रेमात पडला आहा अन् बायको अडथळा आणते आहे, क्रोध येतो. तुम्ही मदिरालयात जाता आहा अन् मधे एक संन्यासी भेटतो अन् दारूविरुद्ध बोलायला लागतो अन् अडथळा आणतो, क्रोध येतो. तुम्ही कंजूष आहा अन् कुणी भिकारी हात पसरून उभा राहतो अन् चारचौघात मोठ्या पेचात टाकतो– क्रोध येतो. तुम्ही नेहमी भिकाऱ्यांना रागानं पैसे दिले असतील, शंभरा-पैकी नव्याण्णव वेळा. तुम्ही केवळ अशासाठी दिले असतील की ब्याद टळावी! तुम्ही केवळ अशासाठी दिले असतील की चारचौघांसमोर.. की लोक काय म्हणतील,

देऊन टाकतो! तेव्हा भिकारीदेखील मोठे हुशार आहेत! ते तेव्हाच हात पसरतात जेव्हा पाहतात की गर्दी आहे, रस्त्यावर एकांतात तुम्ही भेटलात तर ते आपला खिसा सांभाळत निघून जातात! तुमच्याकडून मिळायची आशा तर नसते, तुम्हीच अजून काढून घेऊ नयेत! एकांतात भिकारी तुमच्यापासून सावध राहतो की एकांतात बरोबर नाही, वैतागात सापडणं योग्य नाही!

तो नेहमी तुम्हाला गर्दीत, रस्त्यावर धरतो, पाय धरतो. तुम्ही चारचौघां-बरोबर चाललेला असता अन् फजिती होते. आता हा इज्जतीचा प्रश्न आहे! भिकारी इज्जतीचा प्रश्न उभा करतो आहे. तो हे सांगतो आहे की आता देऊन टाका एक पैसा, एका पैशासाठी बदनामी नका करून घेऊ, लोक काय म्हणतील! तुम्ही रागानं देता. अन् जे क्रोधात दिलं गेलं ते दिलंच नाही गेलं. कारण दान केवळ प्रेमात आहे.

जर तुमच्या लोभात कुणी अडथळा आणला तर त्याच्यावर क्रोध येतो. म्हणून तर जुनी म्हण आहे, 'जर, जोरू, जमिन'. ही वैतागाची तीन कारणं खूप प्राचीन काळापासून लोक समजताहेत. 'जर, जोरू, जमिन' याचा अर्थ असा की एक तर पैसा वा काम ही दोनच वैतागात नेतात. दोन्हीही क्रोधाचं कारण बनतात. क्रोध दोन्हीच्या मधे आहे. जणु क्रोधाची नदी वाहाते आहे अन् दोन किनारे आहेत–एक कामाचा अन् एक लोभाचा. जर काम अन् लोभ विर्सजित झाले तर क्रोध लगेच विलीन होऊन जातो.

आता ही मोठी मजेशीर गोष्ट आहे की लोक माझ्याकडे येतात, जे विचारतात की क्रोध कसा नाहीसा होईल? माझ्यापाशी कुणी माणूस नाही आला, ज्यानं विचारलं असेल की लोभ कसा नाहीसा होईल! कुणी माणूस नाही आला आत्तापर्यंत, ज्यानं विचारलं असेल, काम कसा नाहीसा होईल? रोज लोक येतात, जे विचारतात, क्रोध कसा नाहीसा होईल?

क्रोध नाहीसा होऊ नाही शकत. क्रोधावर सरळ हल्ला करायचा कुठला मार्गच नाहीये. कारण क्रोध बायप्रॉडक्ट आहे तो तर काम अन् लोभ यांच्या मधे जगतो.

लोक जेव्हा विचारतात की क्रोध कसा नाहीसा होईल तेव्हा मी खूप पेचात सापडतो. त्यांना काय सांगावं? त्यांची निराशा करणंदेखील बरोबर नाहीये' कमीत कमी इतकं तरी विचारायला आले आहेत तेदेखील काय कमी आहे! पण मी त्यांना सांगू काय? कारण जर त्यांना म्हटलं की लोभ नाहीसा करा तर ते गायब होतील! पुन्हा कधी ते येणार नाहीत! ते क्रोध नाहीसा करू इच्छितात अन् क्रोधही नाहीसा का करू इच्छितात, तर लोभ सोयीनं करू शकावं अन् कामाचा भोग शांतपणे व्हावा म्हणून! दुसरं कुठलं कारण नाहीये



क्रोध नाहीसा करण्याचं. कुणी परमात्मा मिळवण्यासाठी क्रोध नाहीसा करू इच्छितात, असंही नाहीये. क्रोधामुळे अडथळा येतो. कधी कधी गिऱ्हाईकाचा राग येतो, मागाहून पश्चाताप होतो. कधी बायकोचा राग येतो, मग मागाहून पश्चाताप होतो. कारण यामुळे कामात अन् लोभात अडथळा येतो. तुम्ही दिवसा बायकोवर रागवा, की रात्री सूड घेईल–जी तुमच्या 'कामा'त अडथळा निर्माण करेल!

क्रोधामुळे 'कामा'त अन् लोभात अडथळा येतो. म्हणून लोक क्रोध नाहीसा करू इच्छितात. पण क्रोध तेव्हा नाहीसा होतो जेव्हा काम अन् लोभ विर्सजित होतात. दुसरा नाहीसा होण्याचा कुठलाही मार्ग नाहीये. असूही नाही शकत. कारण तो दोहोंच्या मधे जगतो अन् जोवर ते दोन उपस्थित आहेत तोवर क्रोध राहीलच. हा विचारही नाही केला जाऊ शकत की लोभी माणूस क्रोध कसा सोडू शकेल. कारण जेव्हा त्याच्या लोभात कुणी अडथळा आणेल तेव्हा तो काय करेल? क्रोध रक्षण आहे. अन् जेव्हा त्याच्या कामात कुणी अडथळा आणेल तेव्हा तो काय करेल?

क्रोध, सारे अडथळे तोडून कामाच्या विषयापर्यंत पोचण्याचा प्रयत्न आहे. क्रोध, तुमच्या अंतर्यामीची आक्रमक हिंसा आहे–जी लोभाचं अन् 'कामा'चं रक्षण करते पण जेव्हा काम अन् लोभच नाही राहिले, रक्षण करायला काही नाही उरलं...तेव्हा रक्षणकर्ता आपोआप निरोप घेतो. तो व्यर्थ होऊन जातो. त्याचं कुठलं प्रयोजन नाही राहात.

कबीर म्हणतो, 'काम क्रोध अरू लोभ विर्वजित, हरिपद चीन्है सोई'– जो माणूस या तिहींना मनाई करतो, या तिहींच्या पलीकडे जातो तोच हरिपद ओळखू शकतो. हरिपद तर तुमच्या अंतर्यामी आहे. जर हे तीन नसतील तर तुम्ही कुठे असाल? जर लोभ नसेल तर जे तुमच्यापाशी आहे, त्यात तुम्ही नाही राहाणार. जर काम नसेल तर जे तुमच्यापाशी नाहीये त्यात तुम्ही नाही राहाणार. मग तुम्ही राहाल कुठे? मग तुमचं चैतन्य कुठे राहील? कुठे असेल तुमचा तळ? अचानक तुम्ही आपल्या अंतर्यामी उभे होऊन जाल–जायला अजून कुठली जागा नाही राहिली. मागे जायलाही कुठली जागा नाही राहिली वा पुढे जायलाही कुठली जागा नाही राहिली. इथेच अन् आताच, तुम्ही आपल्या अंतर्यामी उभे होऊन जाल. तुम्ही आपल्या स्वरूपात लीन होऊन जाल. तेच स्वरूप हरिपद आहे. तिथेच परमात्म्याची पावलं आहेत.

हा 'हरिपद' शब्द खूप महत्त्वाचा आहे. तुम्ही इतक्या लौकर हरि नाही मिळवणार पण हरिपद मिळवाल. तुमच्या अंतर्यामी, तुमच्या हृदयी खोलवर परमात्म्याची पावलं आहेत. पण जर पावलं मिळवली तर परमात्मा जास्त दूर नाहीये.. जर पावलं हाती आली तर परमात्मा जास्त दूर नाही. तुमच्या अंतर्यामी

त्याची पावलं आहेत. त्याचं सारं शरीर तर ब्रह्मांड आहे. त्याचं सारं शरीर तर हे अस्तित्त्व आहे. पण प्रत्येक हृदयात त्याची पावलं आहेत प्रत्येक हृदयातून त्याच्याकडे जाणारा मार्ग आहे त्याचे पाय धरणंच त्याच्या मार्गानं जाणं आहे.

पाय धरण्याचा अर्थ आहे, समर्पण. परमात्म्याची पावलं तुमच्या हृदयात आहेत. याचा अर्थ असा आहे की जर तुम्ही हृदयाला समर्पित होऊन जाल तर तुम्ही किरण धरला. आता सूर्य जास्त दूर नाही. कितीही दूर असेल तरीदेखील जास्त दूर नाही. ज्यानं किरण पकडला त्यानं सूर्याचा पाय धरला.

'काम क्रोध अरू लोभ विवर्जित, हरिपद चीन्हैं सोई।'

'राजस तामस सातिग तीन्यू, ये सब तेरी माया।

चौथे पद को जे जन चीन्हैं तिनहिं परमपद पाया।'

सत्व, रजस, तमस्–या तीन गुणांमधे सांख्यानं साऱ्या जगाला विभागलं आहे. ही तीनाची संख्या महत्त्वाची आहे. कारण ज्या कुणी जाणलं आहे त्यांनी दिलेली नावं वेगवेगळी असोत–कुणी वेगळं नाव देवो, कुणी वेगळं–पण त्या साऱ्यांनी अस्तित्त्वाला तीन भागात विभागलं आहे. सत्व, रजस्, तमस् हे सांख्याचे शब्द आहेत. त्रिमूर्ती–ब्रह्मा, विष्णू, महेश–हिंदूंची सामान्य धारणा आहे. ट्रिनिटी ख्रिस्ती लोकांची धारणा आहे. अन् आता शास्त्रज्ञ म्हणतात की पदार्थाच्या शेवटच्या शोधात त्यांना तीन आढळले. विश्लेषणाच्या शेवटच्या क्षणी त्यांना आढळलं की इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन अन् प्रोटॉन या तिन्हींनी सारं अस्तित्त्व बनलं आहे असं वाटतं की तीन सत्याची सूचना आहे. कुठूनही कुणी शोधलं, एकाप्रत पोचण्यापूर्वी त्याला तीन आढळले आहेत.

या आश्रमासाठी जे प्रतीक निवडलं आहे–फाउंडेशनसाठी तो या दिशेनं संकेत आहे. एक तीन होऊन जातो–संसार सुरू झाला. मूळ गुण सुरू झाला. तीन नऊ होऊन जातात–संसार ओतप्रोत होऊन गेला, बाजार पूर्ण भरून गेला. मग नवाचा पुन्हा एक होऊन जातो. संसार जगून घेतला, पाहून घेतला. स्रोताकडे माघारी पोचले, स्रोत प्राप्त झाला. एकाचे तीन. तीनाचे नऊ. नवाचा पुन्हा एक. नवाचा अर्थ आहे, अनंत–हे सारं वस्तूंचं जगत्. तीनाचा अर्थ आहे, या अनंततेचा आधार. अन् एक, जिथे सारी माया हरवून गेली; जिथे सारी दृश्यं हरवून गेली; जिथे केवळ द्रष्टा राहीला. तो द्रष्टा एक आहे. तो चौथा आहे.

म्हणून कबीर म्हणतो, 'राजस तामस सातिग तीन्यू'–-या तिहींनाच–- 'यह सब तेरी माया।'

मायेचा अर्थ होतो जी दिसते अन् नाहीये.

पूर्वेकडे आपण तीन विभाग केले आहेत. एक, जे दिसत नाही अन् आहे–त्याला आपण ब्रह्म म्हणतो. दोन, जे दिसतं अन् नाहीये–- त्याला आपण माया म्हणतो. ती स्वप्नवत् आहे. अन् तीन, तो जो तेदेखील पाहातो जे माया आहे अन् तेदेखील पाहातो जे माया नाहीये तो द्रष्टा आहे.



'चौथे पद को जे जन चीन्हैं, तिनहि परमपद पाया।' तोच परमावस्थेला प्राप्त होऊन जातो, ज्यानं चौथ्याला ओळखून घेतलं. तीन पाहता पाहता हळूहळू चौथ्याची ओळख पटते.

असं समजा की तुम्ही एक नाटक पाहायला गेला आहा जेव्हा तुम्ही नाटक पाहाता तेव्हा तुम्ही अगदी विसरूनच जाता की तुम्हीदेखील आहा! नाटकच राहून जातं. थिएटरात बसल्याबसल्या तुम्हाला आठवच नाही राहात की तुम्ही आहा. अन् जर तुम्हाला वारंवार आठव आला की तुम्ही आहा तर तुम्ही समजता की नाटक बरोबर नाहीये! मनच नाही लागलं, लीन नाही झाला खुर्चीवर चुळबूळ करत राहिला, अस्वस्थ होता. नाटकाचं कौशल्य हेच आहे की तुम्ही स्वतःला अगदी विसरून जावं, पाहणाऱ्याला आठवच राहू नये की मी आहे, जे दिसतं तेच राहावं. कुशल नट तोच आहे जो द्रष्टयाचा अगदीच विसर पाडेल, आठवच नाही राहू देणार.

असं किती तरी वेळा होतं. तुम्ही सिनेमा पाहाता. तिथे पडद्यावर काहीही नाहीये. केवळ ऊन–सावलीचा खेळ आहे. पण कुठलासा क्षण येतो अन् तुम्ही हुंदके देऊन देऊन रडायला लागता! तिथे केवळ ऊन–सावली आहे. मागेदेखील काही नाहीये. एक प्रोजेक्टर लावलेला आहे. तो केवळ फिल्मद्वारे प्रकाश टाकतो आहे. पडद्यावर काहीही नाहीये. तुम्ही अगदी जाणता. कारण जेव्हा तुम्ही आला होता तेव्हा पडदा कोरा होता. आता सारा खेळ रचला गेला आहे आता कुठली अशी घडी आली आहे जिथे तुम्ही अगदी खूप रडू लागता. तेव्हा बरं आहे की हॉलमधे काळोख असतो. सारे आपापले रूमाल काढून आसवं पुसायला लागतात. काळोखामुळे सोयीचं होतं. नाही तर वैताग होईल! काळोख असणं अगत्याचं आहे. नाही तर द्रष्टा हरवणं अवघड होऊन बसेल. काळोखामुळे द्रष्टा हरवून जातो काळोखामुळे दृश्य उठून दिसतं.

कधी तुम्ही हसता, कधी तुम्ही रडता, कधी तुम्ही उदास होऊन जाता, कधी तुम्ही आनंदून जाता–-- अन् तुम्ही कधी विचारही करत नाही आहा की तिथे पडद्यावर काहीही नाहीये!

तिहींचा –– सत्व, रजस्, तमस् वा इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांचा हा जो सारा खेळ आहे...जाणणाऱ्यांनी जाणलं आहे की हा मोठा रंगमंच आहे. गहन नाटक चाललं आहे. तुम्ही पाहाणारे आहा. पण तुम्ही अगदी हरवून गेला आहा. कारण ते लिहिणारादेखील परमात्मा आहे अन् ते चालवणारादेखील परमात्मा आहे. सारा खेळ मोठ्या कौशल्यानं चालला आहे. कौशल्य असं आहे की तुम्हाला

अजिबातच आठव नाही राहिला की तुम्ही आहा. अन् नाटक सामान्य प्रकारचं नाहीये.

जपानमधे एक नाटक होतं वा आत्ता अमेरिकेत एक नवं नाटक सुरू झालं आहे. ते त्याला नो–ड्रामा म्हणतात. त्याचं नावच अ-नाटक आहे ! अन् ते झपाट्यानं पसरतं आहे, अमेरिकेत पसरेल. कारण त्यात मोठा रस आहे. अन् त्या नाटकाचं वैशिष्टच असं आहे की त्याचा जगाशी कुठला खोलवरचा संबंध आहे. नाटक असं आहे की त्यात रंगमंच नाही असत, अन् प्रेक्षक अन् नट वेगवेगळे नाही असत. नट प्रेक्षकांसमवेतच बसतात. मग नाटक सुरू होतं. त्यात प्रेक्षकही भाग घेतात. तुम्हाला मधेच वाटलं, तुम्ही मधे गेलात. अन् तुम्ही काही–बाही सांगायला सुरवात केलीत ! त्याची कथा आधीपासून लिहिलेली नाही असत, डायलॉग्ज् विभागलेले नसतात ! कुणी नाही जाणत की काय होईल ! पण त्यात मोठं स्वारस्य आहे कारण अनपेक्षित घडू शकतं. त्यात पाहाणारे अन् नाटक करणारे वेगवेगळे नाही असत. सारे त्यात भाग घेतात. अन् जे लोक त्यात भाग घेतात त्यांना जास्त रस वाटतो, नाटक पाहाण्यापेक्षा. कारण तुम्हीदेखील वाटेकरी होऊन जाता. तुम्हाला रडायचंच आहे तर तोंड लपवून रडण्याची गरज नाही. तुम्ही उठून मधे जाता अन् मनमोकळेपणानं रडू लागता ! अन् तुम्ही साऱ्या नाटकाचा प्रवाह बदलून टाकता. कारण तुमचं रडणंदेखील सांभाळाव लागतं की आता यांचं काय करावं ! यांना काही सांगावं लागतं. अन् यांना सांगण्यामुळे सारी कथा बदलून जाते, सारी बातचीत बदलून जाते. कुठे शेवट होईल, काही ठाऊक नाही ! कुठे सुरवात होईल, काही ठाऊक नाही !

हे नाटक जगाचं नेमकं प्रतीक आहे. इथे तुम्ही प्रेक्षक वेगळे नाही बसलेला खुर्चीवर अन् रंगमंचावर नाटक नाही चाललेलं ! . . . रंगमंचावर नाटक चालतं, तुम्ही खुर्चीवर बसता. तिथेही तुम्ही विसरून जाता. मग इथे तर तुम्ही विसरूनच जाल ! इथे रंगमंचच रंगमंच आहे, इथे कुणी वेगळा नाहीये ! इथे सारेच नट आहेत अन् सारे पाहाणारे आहेत !

विसरणं अगदी स्वाभाविक आहे काही वाईटही नाहीये की विसरून गेला. पण जर आठव आला, जर आठव आला तर ज्या दुःखांनी तुम्ही व्यथित आहा, काळजांनी ग्रस्त आहा, ताणांनी वैतागलेले आहा– ते सारं विलीन होऊन जातं. जर हा आठव आला की तुम्ही पाहाणारे आहा, करणारे नाही तर नाटक चालत राहील. तुम्ही एका कोपऱ्यात बसाल अन् हसाल. तुमची स्थिति अशीच असेल जसं कबीर म्हणतो, 'गूंगे केरी सरकरा, खाये ऑर मुस्काय।' तुम्ही एका कोपऱ्यात बसून आपला स्वाद घ्याल, कारण तोच मधुरतम आहे. अन् तुम्ही लोकांना हसाल की उगाच वैतागताहेत, खूप वैतागताहेत. तुम्ही एका कोपऱ्यात बसाल. हे बसणंच संन्यास आहे. या बसण्याचा एकूण अर्थ इतकाच आहे की मला जाण यायला लागली आहे की कर्ता बनण्याची कुठली गरज नाहीये. माझा स्वभाव द्रष्टचाचा आहे मी तिहींच्या पलीकडे चौथ्याला ओळखलं आहे.



चौथा आहे. तुमच्या अंतर्यामी पाहाणारा. म्हणून साऱ्या ध्यान–पद्धती चौथ्याला जागं करण्याच्या पद्धती आहेत की कसे तुम्ही जागृत बनाल, कसे तुम्ही जास्तीत जास्त जागेपणानं भरून जाल, कशी तुमची मूर्च्छा अन् तंद्रा मोडेल, कसे तुम्ही दृश्यापासून दूर व्हाल अन् द्रष्टचात स्थिरावाल.

'चौथे पद कौ जे जन चीन्हैं, तिनहि परमपद पाया।'

'अस्तुति निंदा आसा छाडै, तजै मान अभिमाना।'

मग तर कुठल्या प्रशंसेचाही प्रश्न नाही वा कुठल्या निन्देचाही, वा कुठल्या आशेचाही, वा कुठल्या अपेक्षेचाही. तुम्हाला द्रष्टचाचा बोध व्हायला लागताच स्तुति अन् निंदा व्यर्थ झाली. कारण स्तुति अन् निंदा तर नटाच्या अपेक्षा आहेत. नटाची इच्छा असते की तुम्ही टाळचा वाजवाव्या, स्तुति करावी नटाची इच्छा असते की लोकांनी निंदा करू नये. कारण त्याचा सारा रस लोक काय म्हणतात यात असतो.

नटाचा अर्थ असा की त्यानं कर्त्याशी इतकं तादात्म्य करून घेतलं आहे की त्याच्या द्रष्टचाचा त्याला काही ठावच नाहीये. तो लोक काय म्हणतात हे पाहातो. सुवास त्यांच्या अंतर्यामी आहे. " कस्तूरी कुंडल बसै– ' पण त्याची झलक तो दुसऱ्यांच्या डोळ्यात पाहू इच्छितो. लोकांनी प्रशंसा केली तर तो खूष आहे, लोकांनी निंदा केली तर तो दुःखी आहे. पण ज्यानं द्रष्टचाला प्राप्त केलं त्याच्यासाठी तर आता कुठली स्तुतीही नाहीये वा निंदाही नाहीये. तुम्ही त्याची निंदा केली म्हणून तो दुःखी नाहीये, तुम्ही स्तुति केली म्हणून तो खूष नाहीये तुम्ही फुलमाळा घालून त्याचं सुख वाढवत नाही, तुम्ही त्याच्यावर शिव्यांचा वर्षाव करून त्याचं सुख कमी करत नाही. तुम्ही काय करता याच्याशी आता त्याचा कुठला संबंध नाही राहिला जोवर तो स्वतः कर्ता होता तोवर त्याचा तुमच्या करण्याशी संबंध होता, आता तो द्रष्टा बनला आहे आता तर तुमच्या द्रष्टचाशीच त्याचा संबंध असू शकतो, तुमच्या कर्त्याशी कुठला संबंध नाही असू शकत. कारण आपण जसे असतो तसाच आपला संबंध असतो. तो तुमच्या कर्तृत्त्वाच्या जगतापासून दूर झाला, पलीकडे गेला. अन् अशा माणसाची कुठली आशा–अपेक्षा नाहीये, कुठलं भविष्य नाहीये. तो परमात्म्याकडूनही काही नाही मागत. त्याचं मागणंच संपून गेलं अन् तो आत कुठली आशाही नाही बाळगत की उद्या काही मोठं होणार आहे. सारं मोठं जे होऊ शकत होतं ते आत्ता होतं आहे. जे काही होऊ शकतं ते होतंच आहे. असं

नाहीये की असा माणूस निराश होऊन जातो. निराश तर तेच लोक होतात, ज्यांना आशा असते.

हा फरक नीट समजून घ्या. कारण पश्चिमेत अशा खूपशा धारणा आहेत की पूर्वेकडचे लोक अशा प्रकारच्या ज्ञानाच्या गोष्टींमधे अडकून निराश होऊन गेले, पॅसिमिस्ट होऊन गेले. नाही, निराश तर तोच होऊ शकतो ज्याला आशा आहे. ज्याला कुठली आशाच नाही त्याला तुम्ही निराश कसं कराल ? त्याचं आनंदीपण अक्षण्ण राहील. त्याचं आनंदीपण, आशेत जगणाऱ्या माणसाहून वेगळं असेल. अन् त्याच्या आनंदात एक प्रकारचं उदासपण असेल, पण हताशपण नव्हे. थोडा सूक्ष्म फरक आहे.

एक माणूस उदास बसला आहे. कारण जुगारात हारला आहे. खूप आशा बाळगून होता. पण लॉटरी हारला. खूप आशा बाळगली होती.. उदासवाणा बसला आहे अन् एक माणूस द्रष्टचाला प्राप्त झाला आहे. तोदेखील त्याच्याच-जवळ बसला आहे. तोदेखील एक प्रकारे उदास दिसेल. त्यालादेखील जगात कुठलं स्वारस्य नाही दिसणार. पण दोहोंच्या उदासपणात मोठा फरक आहे. पहिल्याचं उदासपण कामनेचं उदासपण आहे. दुसऱ्याचं उदासपण निष्काम भावाची शांति आहे. त्यात उत्तेजकता नाहीये म्हणून उदासपण वाटतं. तो कुठे पळत नाहीये, म्हणून शांतपणे बसला आहे.

बुद्ध बसला आहे. महावीर बसला आहे. त्यांच्या बसण्यातही तुम्हाला उदास-पण दिसू शकतं. कारण ते कुठे जात नाहीयेत. सारं जाणं बंद झालं आहे. आता ते इतके शांत आहेत की तुम्ही त्यांची शांतिदेखील नाही ओळखू शकणार. त्यांची शांति खूप गहन आहे. त्या गहनतेमुळे उदास वाटते.

तुम्ही कधी नदीचं खोल पाणी पाहिलंय ? जेव्हा नदीचं पाणी खूप खोल असतं तेव्हा उदास वाटतं. जेव्हा नदी उथळ असते अन् दगडाधोंड्यांवरून अन खडकांवरून नदीचा प्रवाह धावतो तेव्हा ती खूप आनंदी वाटते. खूप आवाज वगैरे करते. पण आवाज करणं नेहमीच उथळपणाचा पुरावा आहे जिथे नदी खरचंच खोल असते तिथे पाणी निळं होऊन जातं. लहरीचादेखील ठाव नाही लागत. नदी इतक्या मंदगतीनं वाहाते की तुम्हाला ठावच नाही लागत की कुठली गतीही आहे. तिथे नदी उदास वाटेल. वाटेल की कुठली गति नाही, कुठलं नृत्य नाही. जेव्हा कधी कुठली गोष्ट खूप गहन होते तेव्हा गीतदेखील अडचण वाटतं जेव्हा कुठली गोष्ट खूप गहन होते तेव्हा आवाज कसला ! ज्ञानियांनी म्हटलं आहे की घडा जेव्हा अर्धवट भरलेला असतो तेव्हा आवाज होतो. जेव्हा पूर्ण भरतो तेव्हा सारा आवाज हरवून जातो. अपूरा भरलेला घडा आवाज करतो, उथळपण आवाज करतं.



म्हणून ज्ञानियात तुम्हाला एक प्रकारचं उदासपण आढळेल, जे उदासपण नाहीये. तर जी त्याच्या खूप गहन अनुभूतीमुळे दाटलेली शांति आहे. तो इतका खोलवर गेला आहे की वरवर तुम्हाला तो उदास वाटेल. त्याचं असणं आता केन्द्रावर आहे, परिघावर नाही

'अस्तुति निंदा आसा छाडै । तजै मान अभिमाना ।'

अशा अवस्थेत मान-अभिमान सारं सुटून जातं.

मान अन् अभिमान यात काय फरक आहे ?

अभिमान ओळखणं खूप सोपं आहे. मान जरा सूक्ष्म गोष्ट आहे. अभिमान फुलासारखा आहे, मान सुगंधासारखा आहे. मान हेरण्यासाठी खूप सूक्ष्म दृष्टि हवी. अभिमान खूप सामान्य आहे, जड आहे, स्थूल आहे. मान खूप सूक्ष्म आहे.

असं झालं, एक रस्त्यात तीन ख्रिस्ती फकीर भेटले. वेगवेगळ्या आश्रमात राहाणारे. एकानं आपल्या आश्रमाची प्रशंसा केली की ही गोष्ट तर तुम्हाला-देखील कबूल करावी लागेल की जसे पंडित आमच्या आश्रमात निर्माण झाले आहेत तसे तुमच्या आश्रमात नाही झाले अन् जशी शास्त्रं आमच्या आश्रमातल्या संन्याशांनी लिहिली आहेत अन् जशा महान टीका त्यांनी लिहिल्या आहेत तसं तुमच्या आश्रमात काहीही नाही झालं. ते दोघं म्हणाले, ही गोष्ट खरी आहे. हे तर तुमचे वैरीदेखील कबूल करतील... आम्हीदेखील कबूल करतो.

दुसरा म्हणाला, पण ही गोष्टदेखील तुम्हाला कबूल करावी लागेल की जसे त्यागी, जसे महान तपस्वी आम्ही निर्माण केले तसे तुमच्या आश्रमात नाही झाले. पंडित नक्कीच झाले आहेत, पण त्यागी नाही.

इतर दोघांनी कबूल केलं की ही गोष्ट खरी आहे अन् अव्हेरली नाही जाऊ शकत मग दोघांनी तिसऱ्याला विचारलं की तुमच्याबाबत काय सांगायचं आहे ? कारण तुमच्याबाबत काहीच ऐकिवात नाही. तुमच्या आश्रमातल्या पंडितांविषयीदेखील कधी कळलं नाही वा कधी मोठ्या महात्यागियांविषयी देखील नाही कळलं...

तो तिसरा म्हणाला की जर तुम्ही आमचंच विचारत असाल तर आम्ही अशी नम्र माणसं निर्माण केली आहेत, ज्यांना पांडित्याचाही अभिमान नाही अन् ज्यांना त्यागाचाही अभिमान नाही. वुई आर टॉप इन ह्यूमिलिटी-नम्रतेत कुणी आमची बरोबरी नाही करू शकणार त्याबाबतीत आम्ही शिखरावर आहो.

हा मान आहे. इतर दोघं अभिमानी आहेत. हे खूप सूक्ष्म आहे.

अहंकारी माणूस अभिमानी आहे. जो निरहंकाराचा दावा करतो आहे तो मानी आहे. ज्याच्यापाशी पैसा आहे तो रस्त्यावरून ताठचात चालला आहे. लक्षात येतं की हा अभिमान आहे. मग हाच माणूस उद्या पैशाला लाथ मारतो,

त्यागी बनून जातो. पुन्हा ताठचात चालतो रस्त्यावरून. कारण हा म्हणतो की लक्षात आहे का की लाखो रुपयांना मी लाथ मारली !... आता हा मान आहे. हे सूक्ष्म आहे.

संसारी माणूस अभिमानी असतो. साधू, संन्यासी, त्यागी, मुनि मानी होऊन जातात. त्यांच्या चालण्यात तुम्हाला मान दिसेल. हे मोठं सूक्ष्म आहे

तुम्ही संन्याशाला चालतांना पाहाता. त्याच्यापाशी काहीही नाहीये, याची अक्कड आहे. सारं सोडून दिलं, साऱ्यावर लाथ मारली ! त्याच्या डोळचात एक भाव आहे की तुम्ही क्षुद्र गोष्टींमधे अडकला आहा, आम्ही परमात्म्याचा शोध घेणारे आहो. तुम्ही लोभी, कामी, क्रोधी अन् आम्ही ध्यानी आहो...

हा मान आहे. अन् जर मान आहे तर अभिमान दडलेला आहे. कुठे गेलेला नाही. थोडा अंतर्यामी सरकला आहे, अजून खोलवर शिरला आहे. विष सूक्ष्म झालं आहे. अन् विष जितकं सूक्ष्म होऊन जातं तितकं धोक्याचं होऊन जातं. म्हणून मला नेहमी आढळतं की संसारी माणसाला तर त्याच्या अहंकाराबाबत जागं करणं सोपं आहे. पण तुमच्या तथाकथित धार्मिक लोकांना त्यांच्या अहंकाराबाबत जागं करणं खूप अवघड आहे. तो इतका सूक्ष्म आहे की त्यांना स्वतःलादेखील उमगत नाही. त्यांना कल्पनाच नाही की नम्रतादेखील अहंकार असू शकते.

जिथे दावा आहे तिथे अहंकार आहे.

कबीर म्हणतो, ज्यानं द्रष्टचाला जाणलं तो 'तजै मान अभिमाना।
'लोहा कंचन सम करि देखै'– आता त्याला लोखंड अन् सोनं सारखंच दिसतं-
"ते मूरति भगवाना' अन् असा माणूस स्वतः परमात्म्याची मूर्ति होऊन जातो. त्याचं द्वैत संपून गेलं, चांगल्या–वाईटाचं अंतर नाही राहीलं. संपत्ति–विपत्तीत फरक नाही राहिला. माती अन् सोनं समान होऊन गेलं 'ते मूरति भगवाना.'

'च्यंतै तो माधो च्यंतांमणि–'जर तो कधी विचार करतो, चिंतन करतो तर परमात्म्याचंच.

परमात्म्याचा विचार कसा कराल ? त्याचं तर कुठलं नावही नाही, त्याचं कुठलं रूपही नाही. म्हणून परमात्म्याचा विचार करण्याचा अर्थच निर्विचार होऊन जाणं आहे. कारण परमात्म्याचा विचार कसा कराल ? परमात्म्याचा विचार करता–करताच माणसाला अचानक जाण येते की विचार करणं होऊच नाही शकत. इथे तर केवळ निर्विचार होण्याचा मार्ग आहे. निर्विचार म्हणजे परमात्म्याचा विचार आहे. 'च्यंतै तो माधो च्यंतांमणि'–जर तो कधी विचार करतो तर विचार करण्याच्या जगात जो चिंतामणि आहे, जी शेवटची गोष्ट आहे... तो माधवाची, परमात्म्याची आठवण करतो.



'हरिपद रमै उदासा'– अन् जर कुठं त्याचं मन रमत असेल तर परमात्म्याच्याच चरणी रमतं. पण त्या मन रमण्यातही उदासपण आहे. याच उदासपणाविषयी मी सांगत होतो. जगाला वाटेल, हा माणूस उदास झाला. पण तो परमात्म्याच्या चरणी रमला आहे.

'हरिपद रमै उदासा'–तो असा अंतर्यामी उतरतो की बाहेरून वाटतं मी तो उपस्थितच नाही राहिला, अनुपस्थित झाला. उदास वाटायला लागतो.

ते उदासपण भ्रम आहे पण त्या उदासपणामुळ सारा वैताग निर्माण झाला. कितीतरी लोकांना वाटलं की उदास होण्यानं हरिपद मिळेल! ते उदास होऊन बसले ! म्हणून उदास लोकांचा संप्रदाय आहे ! उदासी संप्रदाय ! ते उदास व्हायला शिकवतात. बसले आहेत, आंघोळीविना ! माशा घोंघावताहेत त्यांच्या अवतीभोवती ! माशांनादेखील उडवत नाहीयेत ! कारण उदास माणसं आहेत, काय करणार ! हारलेली, दमली–भागलेली ! हताश होऊन बसली आहेत ! हे तर मरणं झालं ! हे कुठलं जीवन नाही झालं ! अन् यानं कुठलं हरिपद नाही मिळणार ! त्या भ्रमात नका राहू! ...पण नेहमी धर्माच्या मार्गात वळतो. हा वैताग होतो, कारण लोक बाहेरून पकडतात.

ज्यांनी हरिपद मिळवलं त्यांच्या जीवनात एक उदासपण येतं. उदासपण गहनतेतून येतं. त्यांच्या चेहऱ्यावर एक गहनता येते. ते खोल नदीसारखे होऊन जातात. हालचाल हरवून जाते. गति विलीन होऊन जाते. ते जास्तीत जास्त आपल्यात रमू लागतात. अंतर्यामी इतका आनंद आहे की सारा जीवन–प्रवाह अंतर्यामाकडे बाहेर कुणी उरतच नाही.

तेव्हा असंदेखील होऊ शकतं कधी की असा माणूस, जे नाही जाणत त्यांना उदास वाटावा. पण तो परम आनंदात लीन आहे. तो हरिपदी रमला आहे.

तेव्हा मग अडचण निर्माण होते दुसऱ्या लोकांना असं वाटतं की उदास होण्यात या माणसाला हरिपद मिळालं, आपणही बसून जावं उदास होऊन... उदासपण बसण्यानं हरिपद नाही मिळत, तर हरिपद मिळण्यानं बाहेरच्या जगाबाबत उदासपण येत. येईलच. ज्याला हिरे मिळतात तो दगडधोंड्यांबाबत उदास होऊन जातो. तो दगडधोंडे कशासाठी सांभाळेल. कशासाठी त्यांच्याकडे लक्ष देईल ? कालपर्यंत सांभाळत होता कारण त्याला हिरे ठाऊक नव्हते. आता हिरे मिळाले, तेव्हा दगडधोंड्यांबाबत उदासपण आलं. आता परमात्म्यात स्वारस्य वाटू लागलं, जगात रस नाही राहिला. हे स्वाभाविक आहे.

पण याहून उलट गोष्ट नाही होत की तुम्हाला जगात रस नाही राहिला तर परमात्म्यात रस वाटू लागेल. की तुम्ही दगडधोंडे सोडून द्याल तर हिरे मिळतील. हिरे मिळाले तर दगडधोंडे सुटून जातात. पण दगडधोंडे सोडण्यानं

हिरे कसे मिळतील ? दगडधोंडे सोडण्याशी हिरे मिळण्याचा काय संबंध आहे ? हिरे मिळाले तर दगडधोंड्यांचा आठव विसरून जातो.

'हरिपद रमै उदासा।' गोष्ट संपली. दगडधोंडे विसरून गेले.

छोटा मुलगा खेळतो आहे, आपल्या खेळण्यांशी. तुम्ही अजून भारी खेळणी घेऊन आलात. छानशी खेळणी घेऊन आलात. चालणारा बाहुला घेऊन आलात वा धावणारी रेल्वे घेऊन आलात. तर तो आपली जुनी खेळणी बाहेर फेकून देतो. काल यांच्याचसाठी भांडत होता. आता यांची कुठली फिकीर नाही करत. तोडून–मोडून बाजूला फेकून देतो. पाय तोडून आत पाहून घेतो की काय आहे ! हिशेब चुकता केला ! आता नव्या खेळण्यात गुंतला. पण तुम्ही जर असा विचार करत असाल की हा जुनी खेळणी सोडून देईल, फेकून देईल तर याला नवी खेळणी मिळतील– तर तशी कुठली अपरिहार्यता नाहीये.

संसार सोडण्यानं परमात्मा नाही मिळत, परमात्मा मिळाल्यानं संसार सुटून जातो. विराटाची झलक मिळाल्यानं क्षुद्र सुटून जातं.

तेव्हा खूप लोक आहेत जे उदास बसले आहेत– सुस्त, आळशी. बुद्धाच्या बसण्यात सुस्ती नाहीये, आळस नाहीये, जडपणा नाहीये. वासना निघून गेली, धाव संपून गेली. पण ऊर्जा परिपूर्ण आहे .. मग अनेक बुद्धू आहेत, ते बसले आहेत ! ते नुसते सुस्त आहेत. चालण्याची हिम्मत नाहीये, इच्छा नाहीये. उठायचीही नाही– कसलीही नाही !'

त्यांची स्थिति अशीच आहे. मी ऐकलंय की दोन माणसं एका झाडाखाली पहुडली होती. जांभळाचं झाड होतं. अन् एक पिकलेलं जांभूळ खाली पडलं तर एक जण म्हणाला की, 'दादा, अगदी माझ्याजवळ पडलं आहे तू जा ते उचलन माझ्या तोंडात टाक' तो म्हणाला, 'राहू दे रे ! तूही काय मित्र आहेस ! कुत्रं माझ्या कानात मुततं आहे अन् तू त्याला हाकलवलं नाहीस !'

असे लोक 'उदासी' होऊन जतात ! ऊर्जा नाहीये. मृतवत् जगताहेत. जर हे बसले तर काय परमात्मा मिळून जाईल ? परमात्मा विराट् ऊर्जेनं मिळतो. जेव्हा तुमची वासना सगळीकडून सुटते–कामातून, लोभातून, क्रोधातून तेव्हा तुमच्यापाशी विराट् शक्ति असते. कारण यातच तुमची शक्ति खर्च होते आहे. त्याच शक्तीवर आरूढ होऊन तुम्ही परमात्म्याची यात्रा करता.

परमात्मा काही सुस्तीनं नाही मिळत. ती कुठल्या आळसाची अन् प्रमादाची घटना नाहीये. तो काही अंथरुणावर पडून राहाण्यानं नाही मिळणार. जर असा मिळत असता तर आळशांना तो कधीच मिळाला असता !

'च्यंतै तो माधो च्यंतामणि, हरिपद रमै उदासा।'



ते रमणं आहे परमात्म्यासमवेत रमणं आहे. ते त्याच्या आनंदोत्सवात लीन होऊन जाणं आहे

ते असंच आहे की जसं तुम्ही जेवायला बसला होता. शिळी भाकर होती अन् महालातल आमंत्रण आलं. तुम्ही ताट भिरकावून दिलं. तुम्ही म्हणाला, को बस पुरे झालं ! तुम्ही महालाच्या दिशेनं धावला...

परमात्म्याची साद जेव्हा ऐकू येते तेव्हा तुमची ऊर्जा साऱ्या जगातून बाजूला होऊन अंतर्यामी वाहायला लागते. अंतर्गमन सुरू होतं. म्हणून बाहेरून तुम्ही कधी कधी उदास दिसू शकता. पण ते उदासपण नाहीये.

'त्रिस्ना अरू अभिमान रहित हवै, कहै कबीर सो दासा।'

अन् अशा क्षणी जेव्हा कुणी परमात्म्यात लीन होऊन जातो तेव्हा तृष्णा, अभिमान कसे राहू शकतील ? ज्याला परमात्म्याची थोडीशी झलक मिळाली त्याच्या मनात कुठलीही तृष्णा कशी राहू शकेल ? ज्याला सारं मिळालं, आता मिळवायलाच काही नाही उरलं...

अन् परमात्म्याहून जास्त मिळवायला काही नाहीही. हे थोडं समजून घ्या. कारण कबीर म्हणतो की आधी कामना सुटावी. जेव्हा कामना सुटून जाते तेव्हा परमात्म्याची झलक मिळते. जेव्हा परमात्म्याची झलक मिळते तेव्हा तृष्णा सुटून जाते. सर्वसाधारणपणे शब्दकोशात लिहिलं आहे की कामना अन् तृष्णा यांचा एकच अर्थ आहे. पण नाहीये. जीवनाच्या शब्दकोशात वेगळा अर्थ आहे.

तृष्णा खूप सूक्ष्म आहे. तुम्ही काही करण्यानं नाहीशी नाही होणार. तुम्ही तृष्णा नाहीशी नाही करू शकणार. तुम्ही कामना नाहीशी करू शकता. ती स्थूल आहे. पण सूक्ष्म अंतरतमात तृष्णा मागे उरेल. तृष्णेचा अर्थ असा की कामना नाहीशी होऊन जाईल पण कामना नाहीशी करूनही तुम्ही या कामनेच्या नाहीसं होण्यानं काही मिळण्याची वाट पाहात राहाल– मोक्ष मिळून जावा, परमात्मा मिळून जावा. कुठेतरी तुमच्या प्राणांमधे सूक्ष्माहून सूक्ष्म लहर उमटतच राहील की पाहा आता कामना सोडून दिली; आता काय मिळतं आहे ? अन् ज्ञानियांनी म्हटलं आहे की कामना सोडून द्या, सारं मिळून जाईल. आता लौकरच सारं मिळण्याच्या बेतात आहे... ही तृष्णा आहे.

कामना–विरहीत होऊनही जी कामना मागे उरते, तिचं नाव तृष्णा आहे सारी इच्छा संपूनही अंतर्यामी एक इच्छा कायम राहाते तिचं नाव तृष्णा आहे.

लोक मला विचारतात की 'ठीक, आपण म्हणता की सारी इच्छा सोडून द्या, पण मग काय मिळेल...' याचा अर्थ असा की मी काय म्हणतो आहे हे त्यांना समजलं नाही. सारी इच्छा सोडून द्या, साऱ्यात ही इच्छादेखील आली. नाही आली का ? ते नाही उमगले माझं सांगणं. पण ते तरी काय करतील ? तृष्णा मोठी

सूक्ष्म आहे. ती नाही आली 'साऱ्या इच्छेत...' शब्द ऐकले त्यांनी. त्यांनादेखील उमगतं आहे की मी म्हणतो आहे की सारी इच्छा सोडून द्या. ते म्हणतात, 'सारी इच्छा सोडून काय मिळेल ? ठीक आहे, आपण म्हणता की वासनाशून्य होऊन जा. पण मग ?' तो जो 'मग' आहे ती तृष्णा आहे ! ते सूक्ष्मतम बीज आहे. पातंजली म्हणतो ते निर्विचारावस्थेपर्यंत टिकून राहील. निर्विचार समाधीतही तृष्णेचं बीज कायम राहील. अन् जेव्हा तृष्णेचं बीज जळेल तेव्हाच निर्बिज समाधि, शेवटची समाधि प्राप्त होईल.

कामना सोडली जाऊ शकते स्थल आहे, बाहेरची आहे. सोडा. जेव्हा तुम्ही सोडून द्याल, काही सोडायला नाही उरणार. केवळ एका भावाचं कंप पावणं राहील की सारं सोडून दिलं आता ?... ही तृष्णा आहे.

कामना सोडण्यानं परमात्म्याची झलक मिळेल. परमात्म्याची झलक मिळण्यानं तृष्णा सुटेल.

अन तसंच अभिमान सोडून द्याल पण तरीदेखील 'मी आहे' हा भाव तर राहील. अभिमान सोडून द्याल, 'मी कोण आहे' हा भाव सोडून द्याल, तरी पण 'मी आहे' हा भाव तर टिकून राहीलच. जेव्हा परमात्म्याची झलक मिळेल तेव्हा हा भावदेखील नाहीसा होईल. मग थेंब पूर्णपणे सागरात लीन होऊन गेला.

'त्रिस्ना अरु अभिमान रहित वहै, कहै कबीर सो दासा ।' कबीर म्हणतो, तोच दास आहे, तोच परमात्म्याच्या चरणांना प्राप्त झाला.

यात्रा अवघड आहे. दहा निघतात, एक पोचू शकतो. तुम्ही तो एक बनण्याचा प्रयत्न करा. नऊ बनणं खूप सोपं आहे. तुम्ही एक बनण्याचा प्रयत्न करा. अन् जर आठव ठेवून चालाल तर कुठलं कारण नाहीये की तुम्ही तो एक होऊ नये जो पोचून जातो. तुम्हीदेखील तो एक होऊ शकता. पूर्णपणे शक्यता आहे. जागं राहून चालण्याची बाब आहे पंचवीस आमंत्रणं मिळतील मधे इथे–तिथे जाण्याची. तुम्ही नकार देऊन टाका. तुम्ही आपलं लक्ष एकाच गोष्टीवर ठेवा की हरिपदापर्यंत पोचायचं आहे.

अन् शेवटची गोष्ट तुम्हाला आजच्या पदात सांगतो तुम्हाला हरिपदापर्यंत पोचायचं आहे. मग तर हरि स्वतःच तुम्हाला उराशी धरेल. त्यापुढे तुम्हाला पोचायचं नाहीये... गोष्ट संपली. तुमची यात्रा पूर्ण झाली. तुम्ही जे करू शकत होता, करून टाकलं. तुमच्याकडून याहून जास्तीची अपेक्षाही नाही केली जाऊ शकत.

म्हणून कबीर म्हणतो की हरिचा दास होऊन जाण्याप्रतची यात्रा आहे– 'कहै कबीर सो दासा–' यानतर मग तुम्हाला काळजी करण्याचं कारण नाहीयें. आता जबाबदारी त्याची आहे. अन् ज्यानं त्याच्या चरणाप्रत पोचण्याची यात्रा



केली, नक्कीच तो हृदयाशी धरला जाईल. तो परमात्म्याच्या हृदयात लीन होऊन जाईल.

पदाप्रत तुम्ही पोचा, हृदयाप्रत परमात्मा तुम्हाला उचलून घेईल. अर्धी यात्रा तुम्ही करा, अर्धी तो करेल.

अन् लक्षात ठेवा की परमात्मा कुणी निष्क्रिय तत्त्व नाहीये. तुम्ही जर त्याच्या दिशेनं चालला तर तोदेखील तुमच्या दिशेनं चालतो. कुठे तरी मध्यावर मीलन होऊन जातं. तुम्ही नाही चालला तर तोदेखील नाही चालत. तुम्ही जेव्हा साद घालता तेव्हा साद ऐकली जाते. जेव्हा तुम्ही प्रार्थनेनं भरून जाता तेव्हा प्रार्थनादेखील ऐकली जाते. तुम्ही जेव्हा खरंच अभिप्सेनं भरून जाता तेव्हा परमात्मादेखील तुमच्याबाबत तितक्याच अभिप्सेनं भरून जातो.

परमात्मा कुठलं निष्क्रिय तत्त्व नाहीये की तुम्हालाच यात्रा करायची आहे. जर असं असतं तर जीवन मोठ्या शेवटच्या अर्थानं उदास असतं.

परमात्मा प्रेम करणारा आहे. जेव्हा तुम्ही प्रेमानं ओथंबून त्याच्या दिशेनं चालता तेव्हा तो तुमच्या दिशेनं चालू लागतो. खूप जुनी म्हण आहे चीनमधे की तुम्ही एक पाऊल चाला, तो हजार पावलं चालतो.

बस्, हरिपदाप्रत तुम्ही पोचून जा. अन् तुम्ही पोचू शकता कारण दूर नाहीये पद. तुमच्या हृदयात सुशोभित आहे. अन् कित्येकदा तुम्हाला त्याची झलकही मिळाली आहे. पण तुम्ही नेहमी त्याला बाहेर समजला आहा की कुठून बाहेरून आवाज येतो आहे. आवाज अंतर्यामातून येतो आहे. आनंदाचा झरा अंतर्यामातून वाहातो आहे––

'कस्तूरी कुंडल बसै'––

□ □

# कस्तूरी कुंडल बसै : २

जग सूं प्रीत न कीजिऐ, समझि मन मेरा ।
स्वाद हेत लपटाइए, को निकसै सूरा ॥
एक कनक अरू कामिनी जग में दोइ फंदा ।
इन पै जो न बंधावई ताका मैं बंदा ॥
देह धरै इन मांहि बास कहु कैसे छूटै ।
सीव भए ते ऊबरे जीवत ते लूटै ॥
एक एक सूं मिलि रह्या तिनही सचु पाया ।
प्रेम मगन लौलीन मन सो बहुरि न आया ॥
कहै कबीर निहचल भया निरभै पद पाया ।
संसा ता दिन का गया, सतगुरू समझाया ॥

भगवानश्री–

कबीराच्या वचनांआधी काही गोष्टी समजून घ्या.

पहिली गोष्ट. संसार, जो सोडायला सारे संत सांगत आले आहेत, तो बाहेर नाहीये; जो सोडून कुणी पळून जाऊ शकेल. संसार मनाचाच खेळ आहे अन् तो अंतर्यामी आहे. अन् बाहेर तुम्ही कितीही धावा, कुठला फरक नाही पडणार. कारण आपला संसार तुम्ही आपल्या अंतर्यामीच घेऊन हिंडता.

संसार, जगाकडे पाहाण्याची तुमची पद्धत आहे. ज्ञानी इथेच दगडांमधे दडलेला परमात्मा पाहातो. तुम्ही चोहिकडे उपस्थित असलेल्या परमात्म्यात दगड पाहता ! पाहण्याची बाब आहे. दृष्टीचीच सारी बाब आहे. तुम्ही तेच पाहाता, ज्या तुमच्या मनाच्या धारणा आहेत. तुम्ही तेच नाही पाहात, जे आहे.

पौर्णिमेची रात्र असेल अन् तुम्ही उदास असाल तर नाचत–गात असलेला चंद्रदेखील उदास वाटतो. अमावस्येची रात्र असेल, आकाश मेघाळलं असेल, सारं उदास अन् खिन्न असेल पण तुम्ही आनंदात असाल तर अमावास्यादेखील पौर्णिमा वाटते ., काळोखदेखील ज्योतिर्मय होऊन जातो. आकाशात होणारा मेघांचा गडगडाट सुमधुर निनाद वाटतो.



तुम्ही जे आहा ते तुम्ही बाहेर विस्तारून पाहाता.

पैशात काहीही नाहीये. तुमच्या मनातच सारं दडलं आहे. तुमचं मन जेव्हा लोभानं ओतप्रोत असेल तेव्हा जगात सगळीकडे तुम्हाला पैसाच पैसा दिसतो. तसाच जसा जर एखाद्या दिवशी तुम्ही उपवास केला असेल अन् तुम्ही बाजारात गेला तर त्यादिवशी तुम्हाला कपड्याची दुकानं, चपलांची दुकानं दिसत नाहीत. त्यादिवशी फक्त मिठाईचं, मिष्टान्नाचं भांडार दिसतं ! सगळीकडून जेवणाचाच वास येत असल्यासारखा वाटतो. सगळीकडून जेवणाचंच आमंत्रण मिळत असल्यासारखं वाटतं. तुमचं पोट भरलेलं असतं तेव्हा हाच बाजार बदलून जातो.

तुम्ही जसे आहा तसंच एक जग तुम्ही आपल्या चोहीकडे निर्माण करता. म्हणून जग, दुनिया एक नाहीये. ही दुनिया तितक्याच आहेत जितकी मनं आहेत. प्रत्येक माणसाची स्वतःची दुनिया आहे, जी तो आपल्या भोवती गुंडाळून हिंडतो. अन जोवर तुम्ही हे नाही समजणार तोवर तुम्ही कधीही संन्यासी नाही होऊ शकणार. कारण तुम्ही ते जग सोडाल जे बाहेर आहे अन् तुम्ही ते जग धरूनच राहाल, जे अंतर्यामी आहे .. अन् बाहेर जग नाहीच, बस् ते अंतर्यामीच आहे. तेव्हा तुम्ही संन्याशाचं जग बनवून घ्याल. कुठला फरक नाही पडणार. हिमालयाच्या गुहेतदेखील बसाल तरी तुम्ही तुम्हीच राहाल अन् तुम्ही जर तुम्हीच आहा तर गुहा तरी काय करेल ! पर्वत, पहाड काय करतील ! तुम्ही तिथेदेखील हळूहळू आपला संसार, आपलं जग पुन्हा थाटून घ्याल ! तुमच्या अंतर्यामी ब्लू-प्रिंट आहे, नकाशा दडलेला आहे की कसा संसार थाटायचा आहे. तो संसार थाटायला जरी कुठलंही सामान नसेल तरीदेखील तुम्ही तो थाटून घ्याल !

मानसशास्त्रज्ञ म्हणतात की जर माणसाला जगाच्या धावपळीपासून वेगळं करण्यात आलं अन् अशा एखाद्या अंधारकोठडीत ठेवण्यात आलं जिथे साऱ्या प्रकारच्या सोयी आहेत, कुठली गैरसोय नाहीये. जेवण्यासाठीदेखील त्याला काही कराव लागू नये. नळचा जोडलेल्या असाव्यात, ज्यांच्याद्वारे त्याच्या रक्तातच सरळ जेवण पोचावं... अशा प्रकारचे प्रयोग करण्यात आले आहेत... अन् शक्य असेल तितक्या आरामशीर बिछान्यावर तो विश्रांति घेत राहिला तर ते म्हणतात की तीन दिवसानंतर तो आपलं जग बनवायला सुरवात करतो. आता कल्पनेत बनवतो. कारण बाहेर तर काहीही नाहीये. केवळ काळोखात बुडालेली अंधारकोठडी आहे. हळूहळू त्याचे ओठ हलायला लागतात. तो त्याच्याशी बोलू लागतो, जो उपस्थित नाहीये ! सुंदर स्त्रिया त्याला वेढून टाकतात ! तो पैशांचे आकडे उभे करायला लागतो ! तीन आठवड्यात माणूस वेडा होऊन जातो.

वेड्याचा एकूण इतकाच अर्थ आहे की ज्याला आपला संसार थाटायला आता कुठल्याही गोष्टीची गरज नाही वाटत. आता कुठल्या कारणाविनादेखील

तो संसार उभा करून घेतो. स्त्री बाहेर असेल तर ठीक, नसेल तर ठीक. आता पडद्याची कुठली गरजच नाहीये. पडद्याविनाच तो स्त्री बनवून घेतो. वेडयाचा अर्थ इतकाच आहे की तो तुमच्याहूनही जास्त कुशल बनला आहे. तुम्हाला स्त्रीत रस घेण्यासाठी कमीत कमी काही आधार हवा. बाहेर कुठली स्त्री हवी. तो अगदी आधारापासून मुक्त आहे. त्याला बाहेर कुठली स्त्री नको आहे. तो आपल्याच मनानं अंतर्यामी दाट प्रतिमा उभ्या करून घेतो.

तुम्ही ऋषी–मुनींच्या कथा वाचल्या आहेत की इंद्र त्यांना विचलीत करायला अप्सरांना पाठवतो. तुम्ही या भ्रमात नका पडू. कुठे कुणी इंद्रही नाहीये वा कुठे कुणी परमात्म्यानं ऋषीमुनींना विचलीत करण्याची व्यवस्थाही नाही करून ठेवलेली. कुणाला विचलीत करण्याची व्यवस्था परमात्मा का करील ? परमात्मा तर इच्छितो की तुम्ही स्थिर होऊन जावं. तेव्हा कुठलंही डिपार्टमेंट नाहीये, जिथे ऋषिमुनींना विचलीत करण्याचा प्रयत्न केला जातो आहे ! ऋषिमुनी स्वतःच विचलीत होताहेत ! ऋषि-मुनी त्याच अवस्थेत आहेत. ज्या अवस्थेची मानसशास्त्रज्ञ चर्चा करताहेत. त्यांनी स्वतःच चोहिकडचं बाह्य जग सोडून दिलं आहे, आपल्या गुहेत बसले आहेत. आता हळूहळू मनाचा खेळ निर्माण करताहेत. आता कुठली गरज नाहीये, आता बाहेरची स्त्री नको आहे, जिच्यावर तुम्ही प्रक्षेपण करावं. आता शून्य आकाशातही तुमचं प्रक्षेपण व्हायला लागलं. आता तुम्ही अप्सरा पाहाता आहा ! पैशांची रास लागली आहे !... तुम्हाला वाटतं कुणी लालूच दाखवतो आहे...तुमचं मनच !...कुणी दुसरा तुम्हाला विचलीत करत नाहीये.

पहिली गोष्ट तर ही समजून घेणं अगत्याचं आहे की जग अंतर्यामी आहे. नाही तर तुम्ही तीच चूक कराल, जी संसारी माणूस करतो आहे. संसारी माणसालादेखील वाटतं की जग बाहेर आहे अन् संन्याशालादेखील वाटतं की जग बाहेर आहे. मग दोहोंच्या ज्ञानात फरक काय ? मग दोहोंच्या समजूतीत कुठला मूलभूत बदल झाला ? संसारी माणूसदेखील पैसा बाहेर पाहातो अन् संन्यासीदेखील पैसा बाहेर पाहातो. तेव्हा दोघं एकाच स्तरावर आहेत. कुठली क्रांति नाही घडली. कुठली जाण जागी नाही झाली. कुठलं ध्यान नाही अवतरलं.

पहिली क्रांति हे सत्य पाहाण्यात आहे की जग माझ्या अंतर्यामी आहे. तुम्ही हे समजून घेताच तुम्हाला असं आढळेल की जग माझ्या अंतर्यामी आहे. बाहेर तर केवळ आधार आहेत; खूंटचा आहेत, ज्यावर आपण आपले कोट टांगून टाकतो. कोट आपले आहेत, खूंटचांचा कुठला दोष नाहीये. अन् खूंटचांनी कधी म्हटलं नाही की कोट टांगा...! अन् एका खूंटीवर नाही टांगला तर दुसऱ्या



खूंटीवर टांगाल ! . . . खूंटी नाही मिळाली तर दारावर टांगाल ! काहीही नसेल तर आपल्या खांद्यावर ठेवाल ! कोट तुमचा आहे. . .

म्हणून कबीरासारखे संत जेव्हा 'जग सूं प्रीत न कीजिए' असं म्हणतात तेव्हा भ्रमात नका पडू. कारण कबीर–पंथी त्या भ्रमात पडले आहेत, त्यांना वाटतं की जग बाहेर आहे, त्याच्यावर प्रेम करायचं नाहीये... जग अंतर्यामी आहे, तुमच्याच मनाचा तो भाग आहे. काही दुसरं सोडायचं नाहीये, बस् मन सोडायचं आहे. दुसऱ्या कशाचा त्याग करायचा नाहीये, बस् मनाचा त्याग करायचा आहे. अन् प्रत्येक माणसाचं स्वतःचं मन आहे. म्हणून तर दोन माणसांचं मीलनदेखील खूप अवघड होऊन बसतं. कारण जेव्हा कधी दोन माणसं जवळ येतात तेव्हा दोन जगांची टक्कर होते. मैत्री खूप अवघड आहे. प्रेम अशक्यसं आहे. म्हणून तर प्रत्येक प्रियकर–प्रेयसी संघर्षरत असतात. पति–पत्नी भांडतच राहातात. काय कारण असेल ? दोहोंची इच्छा होती की बरोबर राहावं. दोघांनी मोठ्या आशा बाळगल्या होत्या, मोठी स्वप्नं साकारली होती. मग सारं विखरून जातं. सारे इंद्रधनू तुटून जातात. सारी स्वप्नं धूळीला मिळतात, अन् हाती भांडण उरतं.

दोन दुनिया आहेत. .जिथे दोन माणसं भेटतात, तिथे दोन दुनिया भेटतात. अन् जेव्हा दोन दुनिया जवळ येतात तेव्हा वैताग होतो. कारण दोन्ही वेगळ्या आहेत.

असं झालं, मी मुल्ला नसरूद्दीनच्या घरी बसलो होतो. त्याचा छोटा मुलगा, रमझान त्याचं नाव आहे, घरची मंडळी त्याला रमजू म्हणतात– तो इतिहासाचं पुस्तक वाचत होता. अचानक त्यानं वर पाहिलं अन् आपल्या वडिलांना म्हणाला, 'बाबा, इतिहासात युद्धाची वर्णनं आहेत... युद्धं सुरू कशी होतात?'

बाप म्हणाला, 'असं समज की पाकिस्तानानं हिंदुस्तानावर आक्रमण केलं. समज...'

इतकं बोलायचा अवकाश की स्वैपाकघरातून बायको म्हणाली की, 'ही गोष्ट चुकीची आहे. पाकिस्तान कधी हिंदुस्तानावर आक्रमण करूही नाही शकत. अन् कधी पाकिस्तानानं हिंदुस्तानावर आक्रमण करू इच्छिलेलंही नाही. पाकिस्तान तर एक शांत इस्लामी देश आहे. तुम्ही चुकीचं सांगता आहा...'

मुल्ला थोडा चमकला ! तो म्हणाला की, 'मी म्हणतो आहे की समज. सपोझ... मी काही असं म्हणत नाहीये की युद्ध होतं आहे अन् पाकिस्ताननं आक्रमण केलं आहे मी तर नुसतं समजावण्यासाठी सांगतो आहे की समज... तुम्ही

बायको म्हणाली, जी गोष्ट शक्यच नाही ती समजायची कशाला ! तुम्ही आधीपासूनच मुलाच्या मनात चुकीचं राजकारण भरवता आहा.

पाकिस्तानच्या विरूद्ध आहा. अन् इस्लामशीही तुमचा ताळमेळ नाही बसत. तुम्ही पूर्ण मुसलमान नाही आहा... अन् तुम्ही मुलाच्या मनात राजकारण भरवता आहा अन् चुकीचं राजकारण भरवता आहा. हे मी नाही होऊ द्यायची..'

ती पोळ्या करत होती, आपलं लाटणं घेऊन बाहेर आली. तिच्याकडे लाटणं पाहून मुल्लानंही आपली काठी उचलली! तो छोटा मुलगा म्हणाला, 'बाबा थांबा! युद्ध कसं होतं ते मला समजलं! आता अजून काही समजावण्याची गरज नाही!'

जिथे दोन माणसं आहेत, ती जवळ यायला लागताच युद्धाची शक्यता सुरू झाली! दोन दुनिया आहेत. त्यांची विचार करण्याची वेगवेगळी पद्धत आहे, पाहाण्याची पद्धत वेगवेगळी आहे. त्यांच्या धारणा वेगळ्या आहेत. ती वेगवेगळ्या वातावरणात वाढली आहेत. वेगवेगळ्या लोकांनी त्यांना बनवलं आहे. त्यांचे धर्म वेगवेगळे आहेत, वेगवेगळं राजकारण आहे, वेगवेगळं मन आहे. अन् जिथे वेगवेगळी मनं आहेत तिथे प्रेम शक्य नाही, तिथे भांडणच शक्य आहे!

मन भांडणाचं सूत्र आहे. म्हणून तर जगात प्रियकर शोधणं इतकं अवघड आहे. मित्र शोधणं अशक्य वाटतं. मित्रातही दडलेला वैरी आढळतो अन् प्रियकराबरोबरदेखील भांडणालाच सुरवात होते.

दोन दुनिया कधीही शांतपणे नाही राहू शकत.

त्याचं कारण?

एक दुनियादेखील आपल्या अंतर्यामी कधी शांतीनं नाही राहू शकत... दोन मिळून अशांति दुप्पट होऊन जाते.

तुम्ही एकटेही कुठे शांत आहा? तुमचं मन तिथेदेखील अशांति निर्माण करून आहे. मग जेव्हा दोघं भेटतात तेव्हा अशांति दुप्पट होऊन जाते. जितकी जास्त गर्दी होत जाते तितकी अशांति दाटत जाते. कारण तितक्या दुनिया संघर्षात पडतात.

ज्या दिवशी तुम्ही हे सत्य पाहू शकाल की तुमचं जग तुमच्या अंतर्यामी आहे. अन् तुम्ही त्याच जगाच्या आधारे बाहेरच्या खूंटयांवर जग निर्माण करता आहा. म्हणून प्रश्न बाहेरचं जग सोडून पळून जायचा नाहीये तर अंतर्यामीचं जग सोडून देण्याचा आहे. मग तुम्ही कुठेही राहा, तुम्ही जिथे कुठे असाल तिथे तुम्ही संन्यस्त असाल. तुम्ही कुठेही राहा— महालात वा झोपडीत, बाजारात वा आश्रमात—कुठला फरक नाही पडणार. तुमच्या अंतर्यामी जे भ्रमाचं सूत्र होतं ते बाजूला झालं.

म्हणून जेव्हा जग सोडण्याविषयी सांगितलं असेल तेव्हा समजून घ्या की कुठलं जग सोडण्याविषयी.... नाही तर मूर्ख लोक बाहेरचं जग सोडून भटकंती



करत राहातात अन् स्वतःला बरोबर घेऊन असतात. स्वतःलाच सोडायचं आहे. इथे काही अजून सोडण्याजोगं नाही. बस्, स्वतःचाच त्याग करायचा आहे. काही आणखी इथे त्यागण्याजोगं नाही.

या प्रतीकांमुळे मोठा पेच निर्माण होतो. कारण कबीर म्हणतो, 'एक कनक अरू कामिनी, जगमें दोइ फंदा'— तेव्हा शब्द तर सरळ आहेत अन् वाटतं की बायकोला सोडून पळून जा– कामिनी. . धन सोडून द्या– कनक. . . सोनं सोडून द्या, धन सोडून द्या, बायकोला सोडून द्या तर ब्रह्म प्राप्त होईल.... जर इतकं सोपं असतं तर पळपुटयांना कधीच परमपद मिळालं असतं! पण इतकं सोपं नाहीये.

कामिनीला सोडण्याचा प्रश्न नाहीये, काम सोडण्याचा प्रश्न आहे. कामिनी तर खूंटी आहे. तेव्हा कबीर प्रतीकाचं बोलणं करतो आहे. अजून कुठला मार्ग नाहीये. प्रतीकानं–मेटॅफरनंच बोललं जाऊ शकतं.

कबीर म्हणतो आहे, कामिनीला सोडून द्या. याचा अर्थ असा की काम सुटताच तुमच्यासाठी कुणी कामिनी नाही राहिली. जोवर काम आहे तोवर कामिनी राहील. कामिनी नाहीये तिथे, तुमचा कामच कामिनीला साकार करतो. सोनं थोडंच तुम्हाला धरून आहे. तुमचा लोभ आहे. सोनं सोडण्यानं काय होईल, लोभ जर अंतर्यामी आहे... तुम्ही काही दुसरं पकडाल. जोवर पकडण्याची आकांक्षा अंतर्यामी आहे तोवर तुम्ही एक वस्तू सोडाल, दुसरी वस्तू पकडाल. मूठ उघडेल, बांधली जाईल. पण उघडी नाही राहाणार. तुम्ही पैसा सोडून द्या, पण पकड कुठल्या दुसऱ्या गोष्टीवर बसेल. तेव्हा असंदेखील होऊ शकतं की तुम्ही महाल सोडून द्याल अन् लंगोटी धरून ठेवाल! अन् लंगोटी सोडून देणं अवघड होऊन बसेल.

कथा आहे की जनकाच्या घरी एक संन्यासी अतीथि आला. अन् त्या संन्याशानं सारं वैभव पाहिलं, विस्तार पाहिला. अन् तो म्हणाला की मी तर ऐकलं होतं की आपण परम ज्ञानी आहा... हा वैभवाचा पसारा, हे कनक-कामिनी... हे कसलं ज्ञान?

जनक म्हणाला, वेळ आल्यावर सांगेन. कारण प्रत्येक गोष्टीची वेळ आहे अन् वेळेआधी काहीही सांगणं व्यर्थ आहे. वेळेवर बी पेरावं लागतं, शेतकरी जाणतो. अन् ज्ञानीदेखील जाणतो की वेळेवरच बी पेरावं लागतं.

जनक म्हणाला, वेळेवर सांगेन. थोडी वाट पाहा. घाई नका करू.

दुसऱ्याच दिवशी सकाळी वेळ आली. आली नाही, जनकानं आणली! परिस्थिति निर्माण केली. संन्याशाला घेऊन गेला. राजवाड्यामागेच नदी होती– आंघोळीसाठी. अन् दोघं जेव्हा नदीत आंघोळ करीत होते तेव्हा अचानक राज-

वाड्याला आग लागली–लावण्यात आली, लागली नव्हती ! कारण संन्याशाचा कुठला भरवंसा नव्हता ! तो इतक्या घाईत होता अन् राजवाड्यातून पळ काढायला इतका उतावळा होता, घाबरलेला होता की कुठे राजवाड्यात अडकून जाऊ नये! कनक अन् कामिनी–सारं तिथे उपस्थित . . . ! तेव्हा घाई करणं अगत्याचं होतं...जनकानं राजवाड्याला आग लावायला लावली ! दोघं आंघोळ करत होते. संन्यासी ओरडला, पाहा ! तुमच्या राजवाड्याला आग लागली. . .

जनक म्हणाला की काय माझं, काय कुणाचं ! काही घेऊन आलो नव्हतो, काही घेऊन जाणार नाही ! रिक्त हस्ते यायचं, रिक्त हस्ते जायचं ! कुणाचा राजवाडा ! लागू दे ! काळजी नका करू ! आंघोळ उरका ! . . .

पण ते ऐकायला तो संन्यासी तिथे नव्हताच ! तो किनाऱ्यावर लंगोटी सोडून आला होता. ती राजवाड्याजवळच होती ! तो धावला ! तो म्हणाला, राजवाड्याचं तर ठीक आहे...पण माझी लंगोटीदेखील राजवाड्याजवळ ठेवली आहे, भिंतीच्या अगदी जवळ. . .

राजवाडा अन् लंगोटी यात कुठला फरक नाहीये ! तुमच्या लोभाबाबत काहीही खुंटी बनू शकतं. तुम्ही अगदी छोट्या खुंटीवर मोठा विराट लोभ अडकवू शकता. कारण लोभाचं कुठलं वजन थोडंच आहे, विस्तार आहे. अन् विस्तार स्वप्नाचा आहे. नुसती हवा आहे ! तेव्हा खुंटी काही फार मोठी हवी असं नाहीये. चूकदेखील, काडीदेखील पुरेशी होईल ! लोभाला कुठलं वजन नाहीये, तो खुंटीविनादेखील अडकेल !

तेव्हा जेव्हा कबीर कनक अन् कामिनी यांचं बोलणं करेल तेव्हा त्याचा हेतू जाणा. कबीर कुणी पंडित नाहीये की चूक करीत असेल. कबीर परम ज्ञानी आहे.

ही प्रतीकं आहेत. तो हे सांगतो आहे की कामिनी तर कामातून निर्माण होते, तुमचा कामच कुणा स्त्रीला खुंटी बनवून घेतो. अन् जेव्हा तुमची काम–ऊर्जा कुणा स्त्रीवर खुंटीसारखी टांगली जाते तेव्हा अचानक तुम्हाला आढळतं की या स्त्रीहून सुंदर स्त्री जगात दुसरी नाहीये. कालपर्यंतदेखील हीच स्त्री होती. अनेकदा रस्त्यावर तुम्ही पाहिली होती. तुमच्या अंतर्यामी कुठलाही पडसाद नव्हता उमटला. ही स्त्री खूप वेळा गेली होती, तुमचं लक्षदेखील आकर्षित नव्हतं झालं. वाऱ्याची एक इवलीशी झुळूकदेखील या स्त्री कडून तुमच्या दिशेनं वाहिली नव्हती. आज अचानक काय झालं की ही स्त्री परम सुंदर होऊन गेली! अन् दुसरे अजूनही हसत असतील की तुम्ही कुणा स्त्रीच्या जाळ्यात अडकला आहा. तिथे काहीदेखील नाही ठेवलेलं.



मजनूला त्या नगराच्या राजानं बोलावून म्हटलं होतं की तू अगदी वेडा आहेस ! लैला कुरूप आहे– लैला खरचंच काळीकुट्ट होती– तू अगदी वेडा झाला आहेस... उगाच 'लैला, लैला' ओरडत हिंडतोस. . .

राजालादेखील दया आली होती. तेव्हा त्यानं राजवाड्यातल्या बारा सुंदर तरूणी समोर उभ्या करवल्या. तो म्हणाला, तू कुठलीही निवड. त्या राजवाड्यातल्या तरूणी होत्या. निश्चितपणे सुंदर होत्या. पण मजनूनं डोकं वर करून पाहिलंही नाही. तो म्हणाला, मला लैलेखेरिज दुसरी कुणी दिसतच नाही. अन् आपण कदाचित् बरोबर सांगत असाल की आपल्याला लैला काळीकुट्ट दिसते.

खरं तर मजनूनं मोठी सारपूर्ण गोष्ट सांगितली की लैलेला पाहायचं असेल तर मजनूचे डोळे हवेत !

जेव्हा तुम्ही कामाच्या नजरेनं कुणा स्त्रीकडे पाहाता तेव्हा अपूर्व सौंदर्याचा वर्षाव होतो. तेव्हा तुम्हाला असं काही दिसायला लागतं, जे तिथे नाहीये... हेच जग आहे ! . . . तेव्हा तुम्हाला तिथे असं काही दिसायला लागत जे तिथे कधीही नव्हतं. तुम्हीच निर्माण केलं होतं. तुमच्या कामानंच कामिनी निर्माण करून घेतली...

जेव्हा तुम्ही सोन्यावर नजर टाकता तेव्हा सोन्यात काय असतं? काय असू शकतं ? अशा जमाती आहेत ज्यांच्यात सोन्याचं कुठलं मोल नाही. अजूनही काही आदिवासी जमाती आहेत. अफ्रिकेत काही टोळ्या आहेत, ज्यांच्यात सोन्याचा कुठलं मोल नाहीये. सोन्याची लगडी पडलेली असेल, त्या टोळीला काही नाही दिसत ! कुठलं मोल नाहीये, तेव्हा गोष्ट संपली... मोल तर आपण जोडतो. पण तुम्हाला सोनं दिसलं तर तुम्ही प्राण पणाला लावाल. सोन्यात काही आहे वा तुमचा लोभ खुंटी बनवतो.

लोभानं सोनं निर्माण होतं, सोन्यानं लोभ नव्हे ! कामानं कामिनी निर्माण होते, कामिनीनं काम नव्हे !

उलटे नका चालू ! नाही तर भटकंती होईल. खूप जणांची भटकंती झाली आहे. म्हणून वारंवार याची पुनरावृत्ति करतो. खूप जण आहेत जे स्त्रियांना सोडून धावताहेत. बिचाऱ्या स्त्रीचा कुठला दोष नाहीये खूप जण आहेत जे सोनं सोडून धावताहेत. सोन्यानं कधी कुणाचं काही बिघडवलेलं नाही. सोनं बिघडवेलही काय ! सोन्याचं सामर्थ्य काय आहे !

अन् जी गोष्ट स्त्रीबाबत लागू आहे तीच पुरुषाबाबत लागू आहे. स्त्रीची कामवासनाच पुरुषाला पुरुषोत्तम बनवून घेते. स्त्रीची कामवासना कुणा पुरुषाच्या अवतीभोवती उभी होताच बदल होऊन जातो. आता तिथे तिचं स्वप्न आहे. म्हणून जीवनात खूप अडचण होते. तुम्ही आपलं स्वप्नं एखाद्या स्त्रीवर

लादता. स्त्री आपलं स्वप्नं तुमच्यावर लादते. तुम्हीही तिचं स्वप्न नाही आहा वा तीदेखील तुमचं स्वप्न नाहीये. अडचण येईल. कारण तुम्ही अपेक्षा बाळगाल की तिनं तुमचं स्वप्न पूर्ण करावं. ती अपेक्षा करेल की तुम्ही तिचं स्वप्नं पूर्ण करावं. अन् लौकरच वस्तुस्थिति प्रकट होईल. कारण वस्तुस्थिति कुणाचं स्वप्न नाही जाणत. वस्तुस्थितीला तुमच्या स्वप्नाशी काय कर्तव्य आहे ?

तुम्ही जेव्हा कुणा स्त्रीच्या प्रेमात पडता तेव्हा तुम्ही म्हणता, सोन्याची काया, सोन्याचा तनु ! स्वर्गीय सुगंध !... तुमच्या म्हणण्यानं कुठला फरक नाही पडणार. उन्हाळ्याचे दिवस जवळ येताहेत ! घाम येईल, स्त्रीच्या शरीराला दुर्गंधदेखील येईल...तेव्हा तुम्ही लाख म्हणा, 'स्वर्गीय सुगंध' !... तुमचं स्वप्न तोडूनही वास वर येईल. तेव्हा तुम्ही अडचणीत पडाल की फसवणूक झाली. अन् कदाचित् तुम्ही असं म्हणाल की या स्त्रीनं फसवलं. कारण मन नेहमी दुसऱ्यावर जबाबदारी टाकतं. ते म्हणेल की ही स्त्री इतकी सुंदर नव्हती जितकं ढोंगसोंग केलं होतं. ही स्त्री इतक्या सोनेरी तनूची नव्हती जितकी हिनं वरुन रंगरंगोटी केली होती ते सारं सजणं होतं, नटणं होतं. भटकंती झाली. भ्रमात पडलो.

स्त्रीलादेखील हळूहळू आढळेल की तुम्ही सामान्य पुरुष आहा. अन् तिनं तुमच्यात जो देव पाहिला होता तो जसाजसा बाजूला सरकेल तसतशी व्यथा अन् अडचण सुरु होईल. अन् तीदेखील तुम्हालाच दोष देईल की निश्चितपणे तुम्हीच कुठलीशी फसवणूक केली आहे, धोका दिला आहे. अन् जेव्हा या दोन फसवणूकी अनुभवाला येतील की एकमेकाद्वारे त्या केल्या गेल्या आहेत तेव्हा भांडण, संघर्ष, वैमनस्य, वैर उभं ठाकेल. तुमचं मन कुणा दुसऱ्या स्त्रीकडे झुकू लागेल तुम्ही नव्या खूंटीचा शोध घ्याल. स्त्रीचं मन कुणा दुसऱ्या पुरुषाकडे झेप घेईल. ती कुणा नव्या खूंटीचा शोध घेईल अन् असंच तुम्ही जन्मोजन्मी करत आला आहा. लाखो खूंट्यांवर तुम्ही स्वप्न टांगलं. लाखो खूंट्यांवर तुम्ही आपली वासना टांगली. पण अजून तुम्ही जागे नाही झाला अन् तुम्ही हे नाही पाहू शकला की प्रश्न खूंटीचा नाहीये. प्रश्न कामिनीचा नाहीये तर कामाचा आहे. हा तुमचाच खेळ आहे. तुम्ही ज्यादिवशी इच्छा असेल त्यादिवशी गोळा करून घ्या. पण जोवर समजून नाही घेणार तोवर गोळा कसं कराल ? धावायचं कुठेही नाहीये. तर तुम्ही जिथे आहा तिथेच आपल्या मनाच्या वासनांचं जाळं गोळा करून घ्यायचं आहे. जसं संध्याकाळी कोळी आपलं जाळ गोळा करतो तशीच जेव्हा बोधाची संध्याकाळ येते, जेव्हा जाण परिपक्व बनते तेव्हा तुम्ही गुपचूप आपलं जाळं गोळा करून घेता. ते तुम्हीच पसरवलं होतं. त्यात कुणा दुसऱ्याचा हात नाहीये. कुणी दुसरा तुमची भटकंती करवत नाहीये,



सोन्याचा काय दोष आहे ? तुम्ही नव्हता तेव्हादेखील सोनं आपल्या जागी पडलं होतं. तुमची वाटदेखील पाहिली नव्हती त्यानं. तुम्ही नाही असणार तेव्हादेखील सोनं आपल्या जागी पडून राहील.

भर्तृहरीनं आपल्या आत्मचरित्रात असा उल्लेख केला आहे. त्यानं राज्य सोडून दिलं अन् राज्य असंच नव्हतं सोडून दिलं, मोठ्या परिपक्वतेनं सोडलं होतं, जाणून सोडलं होतं. जीवन उपभोगलं होतं अन् जीवन उपभोगण्यानं जी व्यथा अनुभवली होती अन् जीवन उपभोगण्यात जे व्यर्थपण अनुभवलं होतं त्यामुळे सोडलं होतं. पण तेव्हादेखील, सोडतानादेखील धूराची एक रेघ अंतर्यामी राहून गेली असेल.

जीवन जटिल आहे. प्रत्येक थरावर अज्ञान आहे. तुम्ही एक थरावर सोडून देता, दुसऱ्यावर ते प्रगटायला लागतं.

सारं सोडून संन्यस्त होऊन भर्तृहरि जंगलात बसला होता. आपल्या गुहेत बसला होता. कुणी पक्षी गीत गुणगुणला. त्यानं डोळे उघडले. पक्षी तर पाहि-लाच, शिवाय त्याला रस्त्यावर पडलेला एक तेजस्वी हिरादेखील दिसला ! अजाणत्या कोपऱ्यातून, अचेतनाच्या कुठल्याशा थरातून थोडासा लोभ डोकावला. थोडीशी हळूवार झुळूक! ठावही लागू नये अशी! ...भर्तृहरीलाच ठाव लागू शकतो जो जीवनाला चांगलं जाणून बाहेर पडला होता. थोडंसं कंपन झालं. ज्योत थरथरली अंतर्यामी की उचलून घ्यावा ! मग थोडंसं हसूही आलं ! याहूनही मोलाची हिरेमोत्ये सोडून आला होता अन् अजूनही उचलण्याची इच्छा कायम आहे ! बरंच काही होतं, मोठं साम्राज्य होतं. हा हिरा काहीच नव्हता. अशा हिऱ्यांच्या खूप राशी होत्या. ते सारं सोडून आला अन् अचानक हा मामूली हिरा रस्त्यावर पडलेला पाहून मनात ही गोष्ट उमटली ...?

खूंट्या सोडण्यानं लोभ नाही सुटत. राजवाडा सोडून देण्यानंदेखील लोभ नाही सुटत. धनाच्या राशींचा त्याग करण्यानंही त्याग नाही होत.

पण भर्तृहरि म्हणजे मोठं जागृत, जागं व्यक्तिमत्त्व होतं. ओळखलं, पकडलं. जागा झाला की, हे काय झालं ! अन् मनात जेव्हा हे मंथन चाललं होतं, जेव्हा हे मनाचं विश्लेषण चाललं होतं की लोभ कुठून उमटला ? क्षणभरापूर्वी नव्हता ...डोळे बंद होते, ध्यानात लीन होता. कुठून, कुठल्या थरातून ? बाहेरून तर नाही आला ? हिरा तर हा लोभ धाडत नाहीये ? ---- या विश्लेषणात तो गुंतला होता इतक्यात त्यानं पाहिलं की दोन घोडेस्वार दोन्ही दिशांनी तिथे आले. अन् दोघांची नजर एकाचवेळी त्या हिऱ्यावर पडली. दोघांच्या तलवारी बाहेर आल्या. दोघं सैनिक होते. राजपूत होते. दोघांनी आपल्या तलवारी हिऱ्यापाशी टेकल्या अन् म्हटलं की, आधी माझी नजर गेली.' तेव्हा दुसरा म्हणाला की,

'तू चुकतो आहेस— आधी मी पाहिला...अन् आता निर्णय करणारं तलवारी-खेरिज कुणी असू नाही शकत....'

दोहोंना ठाऊकही नव्हतं की एक तिसरा माणूसदेखील गुहेत लपून बसला आहे. जो पाहातो आहे. तलवारी खणखणल्या. क्षणाभरापूर्वी दोघं जिवंत होते, क्षणाभरानंतर दोघांची प्रेतं पडली होती. हिरा आत्तादेखील आपल्या जागेवर होता. तो रडलाही नाही, त्यानं पश्चातापही केला नाही, काळजीतही पडला नाही अस्वस्थही झाला नाही! जणु काही झालंच नाही! हिऱ्याला काय झालं?... पण भर्तृहरीला मोठी जाण आली की हिरा आपल्या जागीच पडून राहील. आपण येऊ अन् निघून जाऊ. हिरे आपल्यासाठी पश्चातापही करणार नाहीत वा निरोप देतेवेळी त्यांच्या डोळ्यात एखादा अश्रूही दाटणार नाही. वा आपल्याला पाहून ते आनंदलेही नाहीत. सारा आपल्याच मनाचा खेळ आहे. आपण टांगतो!

ही घटना पाहून भर्तृहरीनं पुन्हा डोळे मिटून घेतले. अन् या घटनेनं भर्तृहरीला मोठी जाण दिली.

सारं पडून राहील. तुम्ही घेऊनही येत नाही वा तुम्ही घेऊनही जात नाही. पण क्षणभर मोठं स्वप्न रंगवून घेता, मोठं इंद्रधनु पसरवून घेता.

मन जग आहे. काम कामिनीचा निर्माता आहे, स्रष्टा आहे, लोभ सोन्याचा जन्मदाता आहे.

आता आपण या सूत्रांमधे प्रवेश करू या.

मोठी सूक्ष्म गोष्ट आहे अन् मोठ्या सरळ शब्दामधे सांगितली गेली आहे. शब्द इतके सरळ साधे आहेत की वाटेल की यात समजावण्यासारखं काय आहे? पण या सरळ साध्या शब्दांमधे इतकं काही भरलेलं आहे की समजावून समजावून देखील समजावलं नाही जाऊ शकणार. तुम्ही समजून घेत राहा, मी समजावत राहातो. कुठला शेवट नाही येणार.

ज्ञानियांचे शब्द नेहमीच सरळ असतात. केवळ अज्ञानी पंडितांचे शब्द अवघड असतात. पंडित अवघडपणे जगतो. अवघडपणावरच त्याचा धंदा आहे. तो वस्तू जितक्या अवघड बनवतो तितका लोकांमधे भ्रम पसरतो की मोठी गूढ गोष्ट आहे! जर पंडित गोष्टी अगदी सोप्या करून सांगेल तर पंडिताची पूजा कोण करेल? तो जटिल बनवतो. तो गुंता करतो. तो गोलगोल मार्गांनी चालतो. तो मोठें अवघड शब्द वापरतो तो मोठ्या पारिभाषिक तर्कांचं जाळं विणतो. तो चोहिकडे असा धूर निर्माण करतो की काही दिसू नये, केवळ इतकंच. लक्षात यावं की हा पंडित कुणी मोठा महान कारागीर आहे!

ज्ञानी नेहमी सरळ असतात.. त्यांचे शब्द सरळ असतात, गोलगोल नाही असत. सरळ हृदयावर आघात करतात. त्यांचा बाण सरळ असतो. अन् म्हणून कित्येकदा



असं होतं की लोक पंडितांच्या जाळ्यात अडकतात अन् ज्ञानियांना मुकतात. कारण लोकांना वाटतं की इतकी सरळ गोष्ट आहे. यात आहेच काय समजून घेण्याजोगं?

लक्षात ठेवा, जिथे सरळ असेल तिथेच समजून घेण्याजोगं आहे. अन् जिथे अवघड असेल तिथे सारा कचरा आहे. तिथे अवघडपण, कचरा दिसू नये म्हणून निर्माण करण्यात आलं आहे.

तुम्ही डॉक्टरांपाशी जाता तर डॉक्टर अशा पद्धतीनं लिहितो की तुमच्या लक्षात येऊ नये की काय लिहिलं आहे!

मुल्ला नसरूद्दीननं ठरवून टाकलं की आपल्या मुलाला डॉक्टर बनवायचं. मी विचारलं, 'असं कारण तरी काय आहे?' तो म्हणाला, 'निम्मा डॉक्टर तर हा आत्तापासूनच आहे! काय लिहितो काही कळतच नाही! अर्धी योग्यता तर त्याच्यात आहेच! आता थोडंसं अजून राहीलं, तर ते कॉलेजात शिकून घेईल!'

ठाव लागता कामा नये. कारण जे लिहिलं आहे ते दोन पैशात बाजारात मिळू शकतं. अन् डॉक्टर लॅटिन भाषेचा उपयोग करतो, जी कुणाला उमगणार नाही! कारण जर तो तुम्हाला उमगणाऱ्या भाषेचा उपयोग करेल तर तुम्ही वैतागाल! कारण तुम्ही म्हणाल की ही गोष्ट तर बाजारात दोन पैशाला मिळू शकते, याचे वीस रुपये?... तुम्ही कसे द्याल!... वीस रुपये तुम्ही लॅटिन भाषेमुळे देता आहा!

जी डॉक्टरांची पद्धत आहे तीच पंडिताची पद्धत आहे. तो संस्कृतात प्रार्थना करतो वा लॅटिनमधे वा रोमन मधे वा अरबीत! कधी लोकांच्या भाषेत नाही करत! लोकांना समजली तर मग प्रार्थना काहीच नाहीये! नाही समजली तर लोकांना वाटतं की काही असेल! मोठं गूढ आहे! पंडिताचा अगदी प्रयत्न असतो की तुम्हाला उमगू नये, तरच त्याचा धंदा चालतो! ज्ञानियाचा पूर्ण प्रयत्न असतो की तुम्हाला उमगावं कारण ज्ञानियाचा कुठला धंदा नाहीये.

कबीराचे शब्द अगदी सरळ—साधे आहेत. ते एका अडाणी माणसाचे शब्द आहेत पण खूप गहन आहेत. त्यापुढे वेद फिक्के आहेत, उपनिषदं थोडी जास्त सजवलेली सावरलेली वाटतात. कबीराची वचनं अगदी नग्न आहेत, सरळ आहेत. त्यात कणभरही जास्त नाहीये, जितकं असायला हवं तितकंच आहे.

'जग सूं प्रीत न कीजिए, समझि मन मेरा।
स्वाद हेत लपटाइए, को निकसै सूरा।'

जगावर प्रेम नको करूस, माझ्या मना जाण. कारण जगावर ज्यानं प्रेम केलं–जगावर म्हणजे तुम्हीच उभ्या केलेल्या जगावर–त्याची भटकंती झाली. भटकंती का झाली ? कारण तो सत्याला कधी जाणू नाही शकला. त्यानं सत्यात आपल्याच मनाचे इतके रंग भरले की सत्याचा रंगच हरवून गेला. तो कधी स्त्रीला सरळ नाही पाहू शकला. पाहिलं असतं तर मुक्त झाला असता.

बुद्ध म्हणतो की काय आहे स्त्रीत ? हाडं, मांसमज्जा ! काय आहे स्त्रीच्या देहात ? अस्थिपंजर !...जर तुम्ही काम बाजूला सारला तर दुसऱ्याच्या देहात काय दिसेल ? मल–मूत्र, मांस–मज्जा ! पण कामानं ओतप्रोत डोळे सोन्याचा तनू पाहातात ! कामानं ओतप्रोत डोळे, जे आहे ते पाहातच नाहीत !

असं घडलं की बुद्ध एका वृक्षाखाली एका पौर्णिमेच्या रात्री ध्यान करत होता. शहरातले काही तरुण एका वेश्येला घेऊन जंगलात आले होते. दारुनं धुंद.. त्यांनी वेश्येला नग्न करून टाकलं. ते थट्टामस्करी करत होते. ते आपल्या क्रीडेत बुडाले होते. त्यांना बेहोष पाहून, दारूनं धुंद पाहून वेश्या पळाली.

थोड्या वेळानं ते शुद्धीवर आले अन् त्यांनी पाहिलं की वेश्या तर गेली. तर ते तिला शोधायला निघाले. कुणी दुसरा तरनाही भेटला, रस्त्याच्या कडेला वृक्षाखाली बुद्ध दिसला. तेव्हा त्यांनी विचारलं की काय हो ! तुम्ही इथून एका अतिशय सुंदर नग्न स्त्रीला जातांना पाहिलं ?

बुद्ध म्हणाला, कुणी तरी इथून गेलं खरं ! पण स्त्री का पुरुष ते सांगणं अवघड आहे ! कारण तो भेद जोवर माझी कामना होती तोवरच होता. आता कोण भेद करतो ! कुणाला कर्तव्य आहे ! काय गरज आहे ! कुणी गेला हे नक्की ! पण स्त्री होती का पुरुष होता हे सांगणं अवघड आहे ! ...अन् तुम्ही म्हणता, सुंदर ! तुम्ही अजूनच अवघड प्रश्न विचारता आहा. सुंदर–असुंदर-देखील गेलं. तो माझ्याच मनाचा खेळ होता ! हो, एक हाडाचा सांपळा, मांसमज्जेनं भरलेला, गेला एवढं नक्की ! कुठे गेला हे सांगणं अवघड आहे. कारण मी दृष्टीला अंतर्यामी नेण्यात लीन आहे. बाहेर कोण कुठे जातो आहे हे मी पाहात राहिलो तर अंतर्यामी कसा जाऊ ? तुम्ही मला क्षमा करा. तुम्ही कुणा दुसऱ्याला शोधा. तो तुम्हाला नेमका पत्ता सांगू शकेल. मी माझा पत्ता शोधतो आहे ! दुसऱ्यांच्या पत्त्याची आता मला कुठली फिकीर नाही राहिली. . .

जर कामाविना तुम्ही स्त्रीकडे पाहिलं वा पुरुषाकडे पाहिलं तर तुम्हाला काय आढळेल ? शरीरात तर काहीही नाहीये. अन् जर काही आहे तर ते अशरीरी आहे. पण कामाची दृष्टि त्याला तर पाहूच नाही शकणार–त्या आत्म्याला जो या हाडामासाच्या देहात दडला आहे. त्या चैतन्याला, त्या ज्योतीला तर कामानं भरलेले डोळे तर पाहूच नाही शकणार. तुम्ही देहावरच भटकंती करत राहाल.



जेव्हा काम गळून पडतो तेव्हा शरीर 'ना–कुछ' काही–नाही होऊन जातं. ते मातीतून उमटलं, मातीत माघारी परतेल. पण शरीर ' ना–कुछ' होताच शरीरात जो दडला आहे त्याची पहिली झलक मिळायला लागते. मग तुम्हाला स्त्रीदेखील आढळत नाही वा पुरुषदेखील आढळत नाही. तुम्हाला सगळीकडे परमात्मा आढळतो.

'जग सूं प्रीत न कीजिए...'

म्हणून कामाच्या दृष्टीनं नका पाहू. तुम्ही आपल्या चोहिकडे जे धारणांचं, दृष्टींचं, वासनांचं, तृष्णांचं जग बनवून ठेवलं आहे त्यानं नका पाहू.

' जग सूं प्रीत न कीजिए, समझि मन मेरा।' माझ्या मना जाण. मूर्खपणा खूप झाला ! ' स्वाद हेत लपटाइए, को निकसै सूरा–'

पण मन नेहमी म्हणतं की मोठा स्वाद आहे. जाणण्यापासून मन बचाव करू इच्छित. कारण भीति वाटते की बोधानं कुठे स्वाद हिरावून घेऊ नये. कुठे स्त्रीची मांसमज्जा, हाडं, मलमूत्र पाहिलं...अंतर्यामी दडलेली देहाची जी स्थिति आहे ती जर एकदा दिसली तर मग स्वाद घेणं अवघड होऊन बसेल.

पश्चिमेत एक मोठा विचारवंत आहे, मानसशास्त्रज्ञ आहे–व्हिक्टर फ्रँकल. तो हिटलरच्या तुरुंगात होता अन् तिथे त्यानं एक घटना पाहिली अन् त्या घटनेनंतर त्याची जेवणातली रूचि गेली. जी आजवर नाही परतली.

कशी घटना असेल ?

त्यानं पाहिलं. कैदी होते. एकदा भाकरीचे काही तुकडे मिळत असत. अन् ते दिवसभर उपाशी राहात असत...ते लोक आपले तुकडे सांभाळून ठेवत असत, जेव्हा भूक लागेल तेव्हा मग थोडंसं खाऊन घेऊ म्हणून. चोविस तासांची भूक.

एक दिवस त्यानं पाहिलं की एका कैद्याला उलटी झाली. यात तर कुठली मोठी गोष्ट नव्हती. खूप लोकांना उलटी होतांना पाहिलं असेल. पण फ्रँकलनं पाहिलं की तो ती उलटीच उचलून पुन्हा खातो आहे.

त्यानं आपल्या आत्मचरितात लिहिलं आहे की त्यादिवसानंतर मग मला जेवणात स्वारस्य नाही राहीलं. आता जेवतो तेव्हा मला तो माणूस अगदी दिसतोच.

एकदा तुम्हाला सत्य दिसलं तर खूप अवघड होऊन बसेल. म्हणून तर मन म्हणतं बोधापासून दूर रहा. हा बोध, ही जाण आपल्या कामाची नाही, अ-जाण बरी ! नाही तर स्त्रीच्या तनूवर हात ठेवाल. कविता म्हणते, संगमरवरी देह आहे पण तुम्हाला जर अंतर्यामीचा मांसमज्जा अन् हाडं दिसताहेत. तर तुम्ही

त्याला संगमरवरी देह नाही म्हणू शकणार. सत्य साऱ्या कविता तोडून टाकेल तुम्ही मोठ्या अडचणीत पडाल.

म्हणून मन म्हणतं जाणण्या–बिनण्याच्या भानगडीत नका पडू. अ-जाण भली! म्हणून तर म्हणतात की अज्ञानातही मोठे आशीर्वाद दडलेले आहेत. स्वाद घेऊन टाका. घाई काय आहे? मन म्हणतं, थोडं अजून! अन् स्वादाबाबत मोठं आश्चर्य आहे, ते असं की स्वाद काल्पनिक आहे अन् दुसऱ्या गोष्टींतून नाही येत. दुसऱ्या गोष्टींतून येऊ नाही शकत. स्वाद तुम्ही घातलेला आहे.

कधी तुम्ही कुत्रा पाहिला आहे? कुत्रा वाळलेलं हाड चघळतो. वाळलेल्या हाडात काहीही नसतं. कुठला रस तर निघू नाही शकत, तेव्हा चोखाल काय? वाळलेलं हाड म्हणजे कुठला ऊस वगैरे नाहीये. त्यात काहीही नाही, अगदी वाळलेलं आहे. कुठलं मांसदेखील नाही लागलेलं आजूबाजूला. रक्ताचा डाग-देखील नाहीये. अगदी वाळलेलं हाड आहे अन् कुत्रा चोखतो अन् मोठा रस घेतो. अन् जर कुणी दुसरा कुत्रा त्याचं हाड हिरावून घ्यायला आला तर प्राणाची बाजी लावून तो ते वाचवायचा प्रयत्न करतो.

काय, होतं काय आहे?

एक मोठी महत्त्वाची घटना घडते आहे. ती तुमच्या जीवनातदेखील घडते आहे. ती समजून घेणं योग्य आहे.

जेव्हा कुत्रा वाळलेलं हाड चघळतो तेव्हा वाळलेल्या हाडामुळे त्याच्या तोंडातलं मास कापलं जातं, रक्त वाहायला लागतं, रक्ताची चव यायला लागते. स्वाभाविकपणे कुत्र्याला वाटतं हाडातून रक्त येतं आहे. तर्क अगदी सरळ–स्पष्ट आहे. तो वाळलेलं हाड जितकं चघळतो तितकं तोंड आतून सोललं जातं. जीभ कापली जाते. हिरड्या कापल्या जातात. टाळू कापली जाते. रक्त वाहायला लागतं. रक्त गळ्यात येतं, कुत्र्याला स्वाद येतो.

अन् सारे स्वाद असे आहेत. स्वाद बाहेरून नाही येत, तुम्ही आणता आहा. तुमचंच तुम्ही रक्त वाहातं आहे. तुम्ही वाळलेली हाडं चघळता आहा. तिथे काहीच नाहीये की काही यावं.

जेव्हा तुम्हाला वाटतं की स्त्रीकडून तुम्हाला सुख मिळतं आहे तेव्हा सुख तुम्हालाच मिळतं आहे. तुमच्याच धारणेचं सुख आहे. तुम्हाला जेव्हा वाटतं की सोन्यानं सुख मिळतं आहे तेव्हा तुम्हालाच सुख मिळतं आहे. तुमच्या धारणेचंच सुख आहे. अन् सोन्यामुळे तुम्ही किती जागी कापले जाता ते तुम्हाला ठाऊक नाही. सोन्याचं ओझं तुम्हाला कसं दाबून टाकतं, याचा तुम्हाला ठाव नाही. तुमच्या लोभात अन् कामात तुम्ही कसे कैदेत अडकता, जिथे जगणंच अशक्य होऊन जातं, याचा तुम्हाला ठाव नाही.



'स्वाद हेत लपटाइए, को निकसै सूरा।'

कबीर म्हणतो आहे की माणूस स्वादामुळे अडकतो. अन् मग कुणी मोठा शूरवीरच असेल, बहाद्दूर असेल तरच त्यातून बाहेर पडू शकतो. केवळ साहसीच बाहेर पडू शकतात —— दुस्साहसी. कारण दुसऱ्याशी लढत देणं तर खूप सोपं आहे. पण स्वतःच्याच मनाशी लढत देणं खूप अवघड आहे. अन् स्वतःच्याच मनाला समजून घेणं खूप अवघड आहे की काय होतं आहे?

कुत्र्याला कसं उमगावं की वाळलेल्या हाडानं माझंच रक्त वाहातं आहे, त्याचाच मी स्वाद घेतो आहे. माणसालाच जिथं नाही उमगत तर बिचाऱ्या कुत्र्याचा तर कुठला दोष नाही.

तुम्ही जिथे जिथे स्वाद घेतला आहे तो तुमच्या रक्ताचाच स्वाद आहे. अन् जिथे जिथे तुम्ही स्वाद घेतला आहे तिथे तिथे तुम्ही आपलं जीवन हरवलं आहे. जिथे जिथे तुम्ही स्वाद घेतला आहे तिथे आपली ऊर्जा हरवली आहे. त्यानं तुम्ही दीन झाला आहा. त्यानं तुम्ही दरिद्री झाला आहा. अन् जेव्हा मी 'दरिद्री झाला आहा' असं म्हणतो तेव्हा मी अंतर्यामीच्या ठेव्याविषयी बोलतो. अन् जेव्हा मी 'दीन झाला आहा' असं म्हणतो तेव्हा अंतर्यामीच्या दीनतेविषयी बोलतो आहे. कारण तुम्ही जितके स्वाद घेतले आहेत तितकंच तुम्ही स्वतःला हरवलं आहे. अन् आज एक अशी घडी आली आहे की तुम्हाला नेमकं ठाऊक नाहीये की तुम्ही कोण आहा, काय आहा, आहातही वा नाही? तुम्ही असं काही स्वतःला हरवून टाकलं आहे, गमावून टाकलं आहे की कुणी बहाद्दरच यातून बाहेर निघू शकतो, कुणी शूरवीर —— 'को निकसै सूरा'

धाडसाची गरज का आहे? सर्वांत मोठ्या धाडसाची गरज, जिथे सवयींच्या जाळ्यातून बाहेर पडायचं असेल तिथे भासते. आता ही तुमची सवय बनली आहे की स्वतःलाच कापायचं अन् झिजवायचं अन् स्वतःचाच स्वाद घ्यायचा. या सवयीनं तुम्ही इतके जास्त वेढले गेला आहा की आता बाहेर येणं जवळ-जवळ अशक्य वाटतं आहे. असं वाटतं की जवळजवळ तुम्ही आपल्या सवयींचं जाळंच आहा, बाहेर कोण येईल? अंतर्यामी उरला कोण आहे जो बाहेर येईल? म्हणून तुम्ही टाळता की उद्या, परवा, पुढे पाहू. अजून तर आयुष्य पडलं आहे. थोडं अजून उपभोगून घेऊ.

माझ्यापाशी लोक येतात. ते म्हणतात की आपण तरुणांना संन्यास देत आहा, संन्यास तर म्हातारपणासाठी आहे?...संन्यासाचा म्हातारपणाशी काय संबंध? म्हातारपणापर्यंत का टाळता आहा? तुम्ही जोवर अगदी दुबळे नाही होऊन जाणार तोवर टाळाल! जेव्हा काही उरणारच नाही, जेव्हा तुम्ही अगदी

मरायला टेकाल तेव्हाच तुम्ही आपलं वाळलेलं हाड सोडाल. तेदेखील तुम्ही सोडणार नाही, सुटून जाईल ! कारण मग धरण्याजोगं सामर्थ्य, क्षमतादेखील नाही उरणार. तेव्हादेखील तुम्ही प्रयत्न कराल की थोडा वेळ अजून ! कारण म्हातारादेखील स्वतःला म्हातारं थोडंच मानतो ! अंतर्यामी तर स्वतःला तरुणच मानतो तो ! कारण वासना कधी म्हातारी होतच नाही. वासना नेहमी तरुण आहे. शरीर थकून गेलं तरी मन नाही थकत. शरीर मोडून गेलं तरी मन नाही मोडत. मन म्हणतं, 'जा, अजून ओढ, थोडा अजून स्वाद घेऊन टाक.' मरेपर्यंतदेखील मन स्वादानं भिजवून, लपेटून ठेवतं.

म्हणून कबीर म्हणतो, 'स्वाद हेत लपटाइए, को निकसै सूरा'–जो बाहेर पडतो तो मोठा शूरवीर.. संन्यास केवळ धाडसी लोकांसाठी आहे. संसार भित्र्यां-साठी. मोठ्यात मोठं साहस, जागं होणं अन् स्थिति पाहाणं आहे. जागं होण्यात भय आहे कारण तुम्ही स्थितीत बराचसा भूतकाळ हरवून टाकला आहे.

असं समजून घ्या की एक माणूस डोळे मिटून, कागदी नावेत बसून सागर ओलांडतो आहे. अन् तुम्ही अचानक त्याला म्हटलं की, 'डोळे उघड मूर्खा ! ही कागदी नाव आहे, कुठेही बुडवून टाकेल !' तर तो तुम्हाला वैरी समजेल. कारण जरी कागदी नाव असली तरी पण जोवर ठाव नाहीये तोवर तर तो निश्चित आहे. तोवर तर तो तिला नावच मानतो आहे. आता तुम्ही त्याला अडचणीत टाकलं, हे सांगून की ही कागदी नाव आहे, बुडेल. आता वैताग उभा ठाकेल. आता तो थरथरेल अन् घाबरेल अन् वैतागेल. तो तुमच्यावर रागावेल. आतापर्यंत जरी स्वप्नच होतं तरी पण हा भरवंसा तर होता की ठीक आहे, पोचून जाऊ.

पैशात तुम्ही आपलं जीवन हरवल. आज अचानक कुणी म्हणतं की पैशात काहीही नाहीये. तर तुमचं आतापर्यंत घालवलेलं जीवन व्यर्थ होऊन जात. एखादा माणूस पन्नास मैल चालून आला अन् तुम्ही म्हणता, माघारी जा ! हा तर मार्गच नाहीये. पन्नास मैल माघारी जा. तिथूनच चौकातून दुसरा रस्ता धरा...

आधी तर त्याला तुमच्यावर उखडावंसं वाटतं. कारण तुम्ही त्याची पन्नास मैलाची यात्रा बिघडवता आहा अन् पुन्हा पन्नास मैल माघारी जायचं आहे. तेव्हा आधी तर तो तुमच्यावर भरवंसा नाही ठेवणार. तो कुणी असा माणूस शोधेल जो म्हणेल की नाही, बरोबर आहा; अगदी बरोबर जाता आहा...

म्हणून तर लोक ज्ञानियांपाशी जायला घाबरतात, भयभीत असतात. किती थोडे लोक बुद्धापाशी पोचले. किती थोडे लोक कबीरापाशी पोचले. जेव्हा सत्य कुठे अवतरतं तेव्हा इतकं अफाट विराट् जग तिथे धाव का नाही घेत ? ते न



जाण्याची हजार कारणं शोधून घेतं. जाण्याचं कारण ते नाही शोधत. कारण अंतर्यामी एक भीति आहे की अशाप्रकारच्या माणसापाशी जायचा अर्थ असा की आतापर्यंत तुम्ही जे होता, तुम्ही जे काही केलं ते सारं चूक ! हे वाजवीपेक्षा जरा जास्तच घाबरवणारं आहे. मग तर आतापर्यंतचं सार जीवन व्यर्थ गेलं ! म्हणजे तुम्ही मूर्ख होता, अ-जाण होता !

ज्ञानियापाशी जाण्याबाबत तीच भीति आहे, जी उंटाला हिमालयापाशी जायला वाटते. म्हणून उंट वाळवंटात राहातात, हिमालयाकडे नाही जात. वाळवंटात तेच उंट हिमालय आहेत !

जेव्हा तुम्ही ज्ञानियापाशी जाता तेव्हा अचानक तुमचं अज्ञान उघड होतं. भीति वाटते. ज्ञानियाच्या प्रकाश–रेखेसमोर तुमची काळोखलेली–रेखा स्वच्छ प्रकटून जाते. तेव्हा माणूस आपल्याहून जास्त अज्ञानी माणसाशी मैत्री करतो. कुणी धाडसी, कुणी शूरवीरच ज्ञानियापाशी जातो. कुणी ही गोष्ट समजून घ्यायला तयार व्हावं की आत्तापर्यंत मी जो होतो तो चुकीचा होतो, याहून मोठं कुठलं साहस नाहीये. याहून मोठं कुठलं साहस नाहीये की आत्तापर्यंत मी ज्या मार्गानं चाललो तो चुकीचा होता. अन् मी पुन्हा अ, ब, क पासून सुरवात करायला तयार आहे....

मन समजावेल की इतके दिवस गेले, थोडे दिवस अजून उरले आहेत. आता का वैतागात पडतो आहेस ? थोडे दिवस काढ याच मार्गावर. पोचलो; नाही पोचलो तरी पण पोचण्याची आशा तर कायम आहे..

माझे एक शिक्षक होते. आस्तिक होते. भजन–कीर्तन, पूजाप्रार्थना करायचे. मी जेव्हा कधी गावी जायचो–मला शाळेत त्यांनी शिकवलं होतं–तेव्हा त्यांना भेटायला जायचो. काही बोलणं व्हायचं. एकदा मी गावी गेलो तर त्यांचा मुलगा आला अन् मला सांगून गेला की आपण घरी नका येऊ...वडिलांनी निरोप पाठवला आहे ..जरी ते व्यथित आहेत, असमर्थ आहेत तरी आपण घरी नका येऊ...

मी म्हटलं, एकदा तर येईन. कमीत कमी हे विचारायला की भानगड काय आहे ? मग कधी नाही येणार.

मी गेलो तर ते रडायला लागले अन् मला म्हणाले, वर्षभर तुझी वाट पाहातो आहे की कधी येशील...पण मी म्हातारा माणूस आहे. अन् तू सारं बिघडवून टाकतोस ! माझी पूजा नीट चालते, प्रार्थना मी योग्य प्रकारे करतो, मंदिरात जातो, उपवास करतो...अन् आता मी म्हातारा माणूस आहे. अन् तू जेव्हा येतोस तेव्हा सारं बिघडवून टाकतोस की या पूजेनं काहीही नाही होणार, ही प्रार्थना व्यर्थ आहे, या उपवासांनी का स्वतःला उपाशी मारता आहा !..

अन् मला तुझी भीति वाटायला लागली आहे. अन् आता माझा मृत्यू निकट आहे. कृपा करून आता मला विचलीत करू नकोस. मी जसा आहे... कारण आता या क्षणी नव्या मार्गावर जाणं अवघड आहे. आता तू मला निश्चितपणे मरू दे. नाही तर मरतांनादेखील तुझा आवाज मला ऐकू येत राहील की हे चूक आहे, जीवन मी असंच हरवून टाकलं. तू कमीत कमी मला भरवंसा तरी दे. तू मला म्हण, सारं ठीक आहे...

मी त्यांना म्हटलं की क्रांतीसाठी वेळेची गरजच नाहीये. क्षणभरात क्रांति होऊ शकते. कारण ही क्रांति समयाबाहेरची घटना आहे. तेव्हा तुम्ही असं नका समजू की जीवन हरवून बसलो. तेव्हा आता क्षणभरात, आता थोडचाशा दिवसात, थोडासा अवधि जो हाती राहिला आहे—हत्ती तर निघून गेला आहे, आता शेपूटच उरलं आहे–आता बदल कसा होईल ? तुम्ही ती गोष्टच सोडा शंभर वर्षं काळोख राहिला असेल अन् जर दिवा लावला तर क्षणभरात काळोख विलीन होऊन जातो. घाबरून नका जाऊ की आता शंभर वर्षं दिवा लावावा लागेल तेव्हा कुठे शंभर वर्षांचा काळोख जाईल. हे गणित इथे लागू नाहीये. अन् काळोख असंदेखील नाही म्हणू शकत की मी शंभर वर्षांचा जुना आहे, म्हणून इतक्या लौकर नाही जाणार... क्षणभरात घटना घडू शकते. पण मन गणित करतं अन् मन म्हणतं की आता शेवटी निश्चितपणे मरू या. तुम्ही निश्चितपणे मरूच नाही शकणार कारण तुम्हाला स्वत:लाच भरवंसा नाहीये. अन् मी तुम्हाला विचलीत करत नाहीये. तुम्ही स्वत;च जाणता आहा की जे तुम्ही करता आहा ते खोटं आहे. नाही तर मी कसं विचलीत करेन ?

चूकीचं करणारा अगदी नीट जाणतो... कितीही समजावेल, कितीही स्वत:ला गुंतवेल, कितीही शब्दांचं जाळं विणेल, सांत्वनेचं घर उभारेल ... चूकीचं करणारा खोलवर जाणतो की चूकीचं होतं आहे.

मुल्ला नसरूद्दीन मरायला टेकला होता. आयुष्यभर 'अल्ला'चं नाव घेतलं होतं. प्रार्थना–पूजा, मशिद, कुराणचं पठन नियमितपणे केलं. अन् मरतेवेळी, शेवटच्या क्षणी तो जोरात म्हणाला, 'हे सैताना, हे अल्ला ! कृपा कर !'

जवळ उभ्या असलेल्या मौलवीनं विचारलं की नसरूद्दीन, मरतांना हे काय करतो आहेस ?

तो म्हणाला की आता खरं तेच सांगतो !.. मला निश्चितपणे ठाऊक नाहीयें की जगाचा मालक अल्ला आहे की सैतान. अन् ते कधी निश्चित नव्हतं. अन् जो कुणी असेल...मरताना दोघांना खुष करणं योग्य आहे ! ही वेळ कुठला दुराग्रह बाळगण्याची नाहीये ! ✓



आयुष्यभराचा संदेह मरतेवेळी उमटेल, वर येईल. आयुष्यभर फसवलं असेल तरी मरतेवेळी तुम्ही फसवू नाही शकणार. मरतेवेळी सत्य प्रकटेल. मरतेवेळी तुम्ही जाणाल की सोनं माती होतं. मरतेवेळी तुम्ही जाणाल की कुणी स्त्री तुम्हाला सुख देणारी नव्हती, कुणी पुरुष तुम्हाला सुख देणारा नव्हता. मरतेवेळी तुम्ही जाणाल की जीवन घालवलं. पण तेव्हा कारायला काहीही नाही उरणार.

शूरवीर तोच आहे जो मरण्याआधी मरण्याची हिम्मत बाळगतो अजून काय अर्थ आहे शूरवीराचा ? तुम्ही भित्रा कुणाला म्हणता ? भित्रा त्याला म्हणता की जिथे कुठे मरण्याची गोष्ट आली तो पळाला, त्यानं कातडी वचावली. शूरवीर तोच आहे जो जीवनासाठी जीवन पणाला लावू शकतो. शूरवीराचा अर्थ आहे जो जीवनासाठी जीवन हरवू शकतो, जो मरायलादेखील तयार आहे. ज्याच्या तयारीत शेवटची तयारीदेखील सामावलेली आहे–मरण्याची तयारी !

अन् आपण पुढे वाचू की कबीर म्हणतो की जो जित्तपणी मरण्याची कला जाणतो तोच केवळ परमात्म्याला प्राप्त होतो.

मरतेवेळी तर सारे मरतात ! पण संन्यासी तोच आहे जो मरण्याआधी मरून जातो अन् जो सांगून टाकतो की या जीवनात कुठलं सार नाही या जीवनाबाबत मी मृतवत झालो. मी एका नव्या जीवनाला सुरवात करतो आहे अन् एका नव्या प्रकाशपथाची यात्रा....बाहेर शोधून पाहिलं, काही नाही मिळालं. आपल्याच मनाचे भ्रम होते, आपल्याच मनाचा पसारा होता. आता पसारा माघारी उचलून घेतो, जाळं उचलून घेतो. आता अंतर्यामीच्या यात्रेला निघतो.

अन्तर्यात्रा म्हणजे साहसाचा निर्णय आहे. बाहेरच्या दिशेनं तर सारे जातात. अंतर्यामाकडे कुणी शूरवीर. ..बाहेरच्या दिशेनं तर पशूदेखील जातात, पाखरंदेखील जातात, रोपंदेखील जातात. तुमचा कुठला गुण–गौरव नाहीये की तुम्ही बाहेरच्या दिशेनं जाता. अंतर्यामाकडे पशूदेखील नाही जात वा पाखरदेखील नाही जात वा रोपंदेखील नाही जात. केवळ माणूस जाऊ शकतो पण सारी माणसं नाही जात, कुणी शूरवीर जाऊ शकतो.

अंतर्यात्रा सर्वात अवघड यात्रा आहे. चंद्रावर पोचणं सोपं आहे. कारण ती देखील बाहेरची यात्रा आहे. आपल्या अंतर्यामी येणं सर्वात अवघड यात्रा आहे. कारण त्या अंतर्यामी येण्यात तुम्हाला आपल्या जन्मोजन्मीच्या सवयींची जाळी तोडावी लागतील. जन्मोजन्मीचे स्वाद व्यर्थ आहेत असं जाणण्याची क्षमता निर्माण करावी लागेल. अन् आजपर्यंत तुम्ही जे काही केलं ते स्वप्न होतं हे सहन करण्याची हिम्मत सर्वात मोठी हिम्मत आहे. मी आत्तापर्यंत चुकीचा होतो, अशी ज्याची प्रचीति दाटते त्याच्या जीवनात खऱ्याची सुरवात झाली, सत्याच्या

दिशेनं पहिलं पाऊल उचललं गेलं. ज्यानं जाणलं की मी अज्ञानी आहे त्यानं ज्ञान–मंदिराच्या दिशेनं पहिलं पाऊल उचललं.

'एक कनक अरू कामिनी, जग में दोइ फंदा !'–लोभ अन् काम– 'जग मे दोइ फंदा' 'इन पैं जो न बंधावई ताका मैं बंदा' –अन् कबीर म्हणतो की मी त्याचे पाय धरेन जो या दोहोंत बांधला नाही जात– 'मैं उसका बंदा–'

'देह धरै इन मांहि वास कहु कैसे छूटे'–

पण प्रश्न असा आहे की देहात राहून, देहात बसत असून यांच्याशी संबंध कसा सुटावा, लोभ; काम कसा सुटावा ? हे खूप गहन आहे. कारण देहात आपण आहोतच अशामुळे की भूतकाळात आपण कामना केली, जन्मोजन्मी आपण कामवासना गोळा केली. त्यामुळेच आपण देहात आहोत म्हणून तर ज्ञानियाला पुन्हा देह नाहीये. त्याचं पुनर्आगमन संपलं आहे. त्याचं येणंजाणं बंद. .

आपण देहात आलोच अशामुळे आहो की आपण न जाणो किती वासना गोळा केल्या आहेत. अन् आपण देहाची इच्छा केली आहे. मरतेवेळीदेखील माणसाची इच्छा असते की दोन क्षण थांबावं. मरतांनादेखील नव्या जन्माची आकांक्षा असते, मग जन्मोजन्मीची आकांक्षा असते की पुन्हा जन्म घ्यावा. तीच आकांक्षा नव्या जन्मात घेऊन येते, नव्या देहात घेऊन येते.

कामामुळे आपण देहात आहो. देहाचा कण न् कण कामवासनेनं बनला आहे.

तीन वासना तुमच्यात भेटताहेत. तुम्ही महावासनांचा एक संगम आहात. तुमची एक वासना, जी मूळ आधार आहे, जिच्यामुळे तुम्ही मागच्या जन्मातून या जन्मात आलात. मग तुमच्या पित्याची वासना, तुमच्या आईची वासना–ज्या दोघांनी मिळून तुम्हाला देह दिला. या तीन वासनांनी तुम्ही बनला आहा. तुमचा देह या तीन वासनांचा संगम आहे. दोन तर दिसतात, जणु गंगा अन् यमुना, तिसरी, सरस्वति दिसत नाही. दोन तर दिसतात. तुमचे वडिल अन् तुमची आई. अन् तिसरी तुमची वासना सरस्वतिप्रमाणे दिसत नाही. तीच खरी आहे. या दोन तर मदतनीस आहेत. कारण तुम्ही इच्छिलं नसतं तर तुमचे वडिल अन् तुमची आई तुम्हाला या जगात आणू शकले नसते. तुम्ही इच्छा केली, त्यांची वासना मदतनीस बनली, तुम्ही गर्भस्थ झालात. तुमच्या शरीराचा रोमरोम, कण न् कण वासनेनं बनलेला आहे.

अन् लोभ...हे थोडं समजून घ्यायला हवं की इतर सारे लोभ, शरीराबाबत आपली लोभाची जी दृष्टि आहे तिचाच विस्तार आहेत. तुम्ही आपल्या घराबाबत लोभी आहात का ?...जो माणूस आपल्या शरीराबाबत लोभ सोडून देतो त्याचा घराबाबत लोभ आपोआप सुटून जातो. कारण शरीरच मूळ घर आहे, मग बाहेरचं घर तर याच घरासाठी सोय आहे. जो माणूस शरीराबाबत



लोभ सोडून देतो त्याचा सोन्याविषयीचा लोभ सुटून जातो. कारण सोनं तर मग याच घराची सजावट आहे. अन् जो या शरीराविषयी लोभ सोडून देतो, त्याचा संपत्तीचा लोभ आपोआप सुटून जातो. कारण त्या साऱ्याचा उपयोग शरीरासाठीच आहे.

तेव्हा शरीर तुमच्या कामाचा अन् तुमच्या लोभाचा आधार आहे. म्हणून जगात एक मोठा चमत्कार आहे. अनेकदा बुद्धाला विचारण्यात आलं. की जर आपली वासना हरवून गेली, जर आपल्यात ज्ञान अवतरलं, जर आपण बुद्धत्वाला प्राप्त झालात तर मग आपण शरीरात कसे जगता आहा ?...हा प्रश्न सगत आहे. कारण आता कुठलं कारण नाही राहोलं. शरीराविषयीही वासना नाही वा कामना नाही वा लोभ नाही. आता आपण शरीरात कसे आहात ?

अवघड आहे समजणं.

कारण बुद्ध म्हणतो, भूतकाळाच्या बळामुळे–मोमेन्टममुळे जसा एक माणूस सायकल चालवतो. तो पायडल मारतो तेव्हाच सायकल चालते. मग पायडल मारायचं थांबवतो तरीदेखील थोड्या अंतरापर्यंत सायकल जाते. मोमेन्टम–ती जी गति इतका वेळ चालवण्यानं चाकांना मिळाली आहे... आता पायडल मारण्याची गरज नाहीये. थोडी यात्रा पायडलविनादेखील होऊन जाते.

लोभ अन् काम हे दोन शरीराचे पायडलस् आहेत. या दोहोंनीच शरीर टिकून आहे. म्हणून बुद्ध पुरुषदेखील जगतात थोडे दिवस. पण त्यांचं जगणं खूप अवघड होऊन बसतं. लोक सर्वसाधारणपणे विचार करतात की बुद्ध पुरुष निरोगी असतील... चूकीचं आहे बुद्ध पुरुष मोठ्या मुश्किलीनं जगू शकतात.

जसं तुम्हाला ठाऊक असेल, जर तुम्ही सायकल चालवत असाल. ती चालते पण आता पडेल की मग...पायडलविनादेखील थोडी चालते पण ती कधीही पडण्याची शक्यता असते.

बुद्धपुरुषाचा शरीराशी संबंध तर तुटून जातो. आता तो शरीरात असा आहे, जणु नाहीये. असा, जशी तुम्ही झाडाची मूळं उखडून टाकली तरीदेखील ते दोनचार दिवस हिरवं राहातं. बस् मूळं तुटून गेली आहेत जमीनीपासून. पण झाड दोनचार दिवस हिरवं राहात. इतकं पाणी त्याच्यात साठलेलं आहे, ज्यायोगे ते हिरवं राहातं. भूतकाळातली साठलेली शक्ति आहे, ज्यायोगे ते हिरवं राहतं.

बुद्धदेखील... महावीर, रमण, रामकृष्ण– असेच शरीरात राहातात.

रामकृष्ण कॅन्सरनं गेले. रमणदेखील कॅन्सरनं गेले. खूप आश्चर्य वाटतं की रमण अन् रामकृष्णासारखे लोक जर कॅन्सरनं मरतात तर मोठा अन्याय आहे.

अन्याय वगैरे काहीही नाहीये. गोष्ट सरळ–स्पष्ट आहे की आता शरीरात कुठलं अंतर्यामीचं बळ नाहीये. कसंतरी चालतं आहे. म्हणून ते कुठल्याही प्रकारच्या रोगाचा आधार बनू शकतं. कारण अंतर्यामीचा धक्का तर आता बंद झाला आहे. आता तर जुन्या धक्क्यावर चाललं आहे. असं समजा की मूळ रक्कम तर संपून गेली आहे, अन् व्याजानं जगत आहे.

'देह धरे इन मांहि बास कहु कैसे छूटै।'–

अन् मग देह आहे. काम अन् लोभ यांनी बनलेलं त्याचं सारं रूप आहे, आकार आहे. मग यांच्याशी संबंध कसा सुटावा ?

सूत्र लक्षात ठेवा. 'सीव भए ते ऊबरे, जीवत ते लूटै।' –जे प्रेतवत् झाले त्यांचा उद्धार झाला अन् जे जिवंत राहिले ते लुटले गेले. 'सीव भए ते ऊबरे' –शव बनले त्यांचा उद्धार झाला. 'जीवत ते लूटै'– अन् जे जिवंत राहिले ते लुटले गेले.

येशूनं म्हटलं आहे, वाचवाल तर हरवून बसाल. हरवायला तयार झाला तर कुणी तुमच्याकडून हिरावू नाही घेऊ शकणार. जगाल तर मराल. मरायला तयार व्हाल तर अमृत तुमचं आहे.

असं म्हणतात की भित्रा हजारदा मरतो, बहाद्दर एकदाच. भित्रा रोज मरतो. मरायला घाबरत राहातो. त्याला प्रत्येक क्षण मृत्यू वाटतो. धाडसी एकदाच मरतो. कारण कुणी या जगाबाबत मरायला तयार झाला रे झाला, की त्यानं म्हटलं की आता मी असा जगेन जसं प्रेत. तसा मग कुठला मृत्यू नाहीये. कारण अशा प्रचीतीत लगेच अमृत अनुभवाला येतं.

मरण्याची कला धर्म आहे. म्हणून मी म्हणतो की मी मृत्यू शिकवतो. काही दुसरं शिकवण्याजोगं नाहीच. जीवन तर तुम्ही शिकलाच आहा, गरजेपेक्षा जास्तच शिकला आहा ! इतकं शिकला आहा की आता ते न–शिकलेलं करणं अवघड जातं आहे.

मृत्यू शिकायचा आहे. धर्म मृत्यूची कला आहे. अन् तुम्ही इच्छित असाल तर म्हणू शकता की अमृताची कलादेखील. कारण इकडे तुम्ही मृत्यू पावला की तिकडे अमृत बनलात. इकडे तुम्ही जगाबाबत डोळे मिटले की स्वतःबाबत डोळे उघडले. अन् डोळे एकाच दिशेनं उघडू शकतात. एक तर बाहेर पाहा नाही तर अंतर्यामी. दोन्हीकडे तुम्ही एकाचवेळी नाही पाहू शकणार. कसं पाहाल ? दृष्टि एक तर बाहेर जाते आहे. तर तुम्ही बाहेरची यात्रा करता आहा. तेव्हा स्वतःकडे पाठ आहे. म्हणून अमृताचा ठाव नाही लागत को तुम्ही कोण आहात.

जेव्हा जीवन-ऊर्जा अंतर्यामीच्या दिशेनं जाते तेव्हा दृष्टि अंतर्यामी वळते, अन्तर्मुखी असते. तेव्हा डोळे मिटून जातात. सारी द्वारं बंद होऊन जातात.



आता तुम्ही बाहेर जात नाही आहा. आता तुम्ही स्वतःच्या दिशेनं उन्मुख आहा. आता तुम्ही स्वतः सम्मुख आहा. अन् तत्क्षणी अमृताचा वर्षाव होतो.

सहजोनं म्हटलं आहे त्या घडीत– 'बिन घन परत फुहार'– कुणी मेघ दिसत नाही अन् अमृताचा वर्षाव होतो. 'बिन घन परत फुहार'– रोमरोम न्हाऊन निघतो. परमात्म्यात स्नान होऊन जातं.

एकच तीर्थ आहे. ते तुम्ही आहा. पण तुम्ही स्वतःकडे पाठ करून चालता आहा... 'सिव भए ते ऊबरे, जीवन ते लूटै'– काय कराल, कसं कराल की ज्यायोगे तुम्ही जिवंतपणी प्रेत होऊन जाल ?

असं झालं. रशियात एक फार मोठा विचारवंत अन् लेखक होऊन गेला– दोस्तोवस्की. जेव्हा तो तरूण होता तेव्हा क्रांतीमुळे पकडला गेला. अन् झारनं त्याला मृत्यूची शिक्षा दिली, अजून दहा मित्र होते. साऱ्यांना मृत्यूची शिक्षा मिळाली. एक दिवस सकाळी सहा वाजता गोळ्या घालण्याचं ठरलं होतं. खड्डे खणण्यात आले. दाही जणांना खड्ड्यांवर उभं करण्यात आलं. सैनिक बंदूका घेऊन ते उभे ठाकले. ते चर्चच्या घड्याळाकडे पाहात होते की सहाचा ठोका पडताच अन् काटयानं सहा दाखवताच गोळ्या घालायच्या. एकेक क्षण युगाचा झाला असेल. पाच मिनिटं उरली, दोन मिनिटं उरली, एकच मिनिट उरलं ! आता प्रत्येक सेकंदाचा हिशोब व्हायला लागला असेल. साऱ्यांच्या नजरा घड्याळावर खिळलेल्या ! सहा वाजता घड्याळाचे ठोके पडले. गोळ्या सुटणार इतक्यात एक घोडेस्वार आला, धावत त्यानं निरोप आणला की मृत्यूच्या शिक्षेऐवजी जन्मठेपेची शिक्षा करण्यात आली आहे. पण सहाचा टोला पडताच एक माणूस तर कोळसलाच. असं वाटून की संपलो, मेलो, सारं आटोपलं ! एक माणूस कोसळलाच ! सूचना देण्यात आली की घाबरू नका. शिक्षा बदलून जन्मठेपेची शिक्षा देण्यात आली आहे.

पण तो माणूस आयुष्यभर जिवंत राहिला, पण वेगळ्याच पद्धतीनं जिवंत राहिला. तो लोकांना म्हणायचा की मी तर मरून गेलो. लोक त्याला वेडा समजायचे. लोक त्याची टिंगल करायचे. पण त्या माणसाच्या जीवनात क्रांति झाली. लोभही राहिला नाही वा मोहही राहिला नाही. कुठलं प्रेमही राहिलं नाही वा कुठली आसक्तीही राहिली नाही. राहायचा, चालायचा, उठायचा, बसायचा, काम करायचा. पण जेव्हा कुणी त्याला विचारायचं तेव्हा तो म्हणायचा की अमक्या तारखेला सकाळी सहा वाजता मी मरून गेलो.

अचानक तो माणूस संन्यस्त होऊन गेला.

दोस्तोवस्कीदेखील त्यांच्यापैकी एक होता. त्यानंदेखील लिहिलं आहे की त्या घडीनंतर मी दुसराच माणूस होऊन गेलो. कारण अगदी नक्की मानलं

होतं की मृत्यू येणार आहे. सहा वाजेतो स्पष्ट झालं होतं की बस्, संपून गेलो. पण मग वचावलो. पण त्या क्षणी जो संपून जाण्याचा भाव आला त्यानं क्रांति झाली.

[संन्यस्तपण अशीच भाव-स्थिति आहे की तुमची जाण अशा एका जागी यावी जिथे तुम्ही ही गोष्ट नीट समजून घ्यावी की या जीवनात काहीही मिळवण्यासारखं नाहीये. या जीवनात मृत्यूखेरिज अजून काही मिळतच नाही. तुमची जाण इतकी दाटावी की तुम्ही स्वतःच म्हणावं की आम्ही मरून गेलो. त्याच दिवसापासून तुम्ही पाण्यात कमळाप्रमाणे होऊन जाल. चालाल, काम कराल, उठाल, बसाल. पण जीवनाचा जो स्वाद आहे, जो रस आहे तो हरवून जाईल. बाहेरच्या दिशेनं जी धाव आहे ती संपून जाईल. असेल तर ठीक. नसेल तर ठीक– सारं समान होऊन जाईल.]

कधी हा छोटासा प्रयोग करा. सात दिवस का होईना. की सात दिवस असे जगा, जणु मरून गेला. कुणी शिवी देईल तर क्रोधाचा कुठला उपाय नसेल कारण तुम्ही मरून गेला ! कुणी खिशातून पैसे काढून घेईल तर काय कराल ?

असं झालं की मुल्ला नसरूद्दीन आपल्या बायकोला विचारत होता की जेव्हा माणूस मरतो तेव्हा त्याला निश्चितपणे कसं उमगत असेल की मी मरून गेलो ? तो कधी कधी मोठे तत्त्वज्ञानाचे प्रश्न विचारायचा ! बायको म्हणाली, डोकं नका खाउ ! अन् फालतू गोष्टी नका विचारू ! जेव्हा मराल तेव्हा कळेल! हातपाय गार पडून जातील !... आता अजून काय सांगू !

एक दिवस तो जंगलात लाकडं तोडायला गेला. थंडीचे दिवस होते अन् गार वारं वाहात होतं हातपाय गार पडायला लागले. तो म्हणाला, मेलो ! कुऱ्हाड खाली टाकून, जसं मेलेल्या माणसानं करायला हवं, तसा तो पटकन् जमिनीवर आडवा झाला. आपल्या गाढवाला–ज्याच्यावर लाकडं न्यायची होती– त्यान झाडाला बांधून ठेवलं होतं. तो आडवा झाला, त्यानं डोळे मिटून घेतले. तो म्हणाला, आता काही करायला नाही उरलं. मामलाच संपला. आता घरी निरोपही नाही धाडू शकत. कुणीच नाहीये. अन् हातपाय गार पडताहेत. उघड आहे. बायकोनं बरोबर सांगितलं होतं. तो अगदी मरून गेला ! तेव्हाच दोन लांडगे आले अन् त्यांनी गाढवावर हल्ला केला. मुल्ला म्हणाला, मी आता काय करू शकणार आहे ? जर आज मी जिवंत असतो तर लांडगे माझ्या गाढवाशी असं वागू शकले नसते. पण आता गोष्ट संपून गेली.

जर तुम्ही सात दिवसही असा विचार कराल की मरून गेलो तर तुम्हाला जीवनाचं एक नवं दर्शन घडेल. कुणी शिवी देईल. तुम्ही ऐकाल. कराल काय ?



जेव्हा मरून जाल अन् कबरीत पडून राहाल अन् कुणी माणूस येऊन शिवी देईल तर काय कराल ?

च्वांगत्से एका स्मशानातून चालला होता. एका कवटीला त्याचा पाय लागला. कुणाची तरी कवटी पडली होती. त्यानं खूप क्षमा मागितली. त्याचे शिष्य म्हणाले की काय मूर्खपणा करता आहा ? म्हातारचळ लागला की काय ! या कवटीची काय क्षमा मागायची ?

च्वांगत्से म्हणाला, हे काही छोट्या लोकांचं स्मशान नाहीये. केवळ राजामहाराजांचंच इथे दफन केलं जातं. न जाणो कोण असेल अन् मागाहून वैताग देईल...

ते म्हणाले, 'अहो ! हा मरून गेला आहे. हा राजा असो वा महाराजा वा भिकारी– सारं सारखंच ! मृत्यू अगदी समाजवादी आहे. तुम्ही त्याची फिकीर सोडा. तुमचं डोकं ठिकाणावर नाहीये. इतके मोठे ज्ञानी पुरुष तुम्ही. . ?

पण च्वांगत्सु कवटी बरोबर घेऊन आला. आयुष्यभर त्यानं ती दूर नाही केली. तो नेहमी ती खाकेत बाळगून असायचा. लोक म्हणायचे जरा बरोबर नाही वाटत. वाईट दिसतं. हे आपण काय करता आहा ?

च्वांगत्सु म्हणायचा, यानं मला आठव राहातो की आज ना उद्या माझी कवटी स्मशानात पडलेली असेल. तुमच्यासारखे लोक तिथून जातील तर क्षमा-देखील नाही मागणार. लाथ मारतील अन् मी काहीही नाही करू शकणार ! तेव्हा काय फरक आहे ! ...आजही कुणी डोक्यावर मारून जातो तेव्हा मी या कवटीकडे पाहतो. कवटी तर हीच आहे. आत्ता कातडीनं दबलेली आहे, झाकलेली आहे. उद्या कातडीनं झाकलेली नसेल ! अजून काय फरक असेल ? अन् जर जीवन तर सत्तर वर्षांचं, ऐंशी वर्षांचं. . .पण कवटी तर स्मशानात पडून राहील, न जाणो किती शतकं ! किती लोक तिथून जातील ! किती लोक ठोकर मारतील ! कुणी क्षमादेखील नाही मागणार ! ...जर अनंत काळापर्यंत ही वागणूक मिळणारच आहे तर सत्तर वर्षांसाठी का उगाच विवाद उपस्थित करायचा !

सात दिवसही जर तुम्ही ठरवलं तर पुन्हा तुम्ही तोच माणूस नाही होऊ शकणार. खेळ म्हणूनही जर तुम्ही सात दिवसासाठी हे ठरवलं की मी मरून गेलो आहे तरीदेखील एक नवी जाण जन्माला आली.

[पण जे लोक जीवनाच्या अनुभवानं जाणून मृतवत् होऊन जातात त्यांचं तर सांगणंच काय ! तेव्हा ते जगतात, जिथे तुम्ही जगता. तुमच्याचसारखे जगतात. सारं काम करतात. जे अगत्याचं आहे ते होतं. पण त्यांच्या जीवनात मग उन्माद नाही राहात. लोभ, काम, क्रोध त्यांच्या जीवनातून विलीन

होऊन जातात. कारण लोभ, काम, क्रोध तर जीवनाच्या आकांक्षेचा भाग आहेत. जीवेषणा– लस्ट फॉर लाईफ– ती जी जगण्याची आकांक्षा आहे, तीच तर लोभ, काम, क्रोध बनून गेली आहे. अन् जेव्हा तुम्ही स्वतःच्या वर्तीनंच मरता आहा, आपल्या मृत्यूनंच मरता आहा तेव्हा कसला लोभ, कसला काम? मग काही करावं नाही लागत. ते आपोआपच हरवून जातात.

म्हणून मी चावी सांगतो– 'सीव भए ते ऊबरे, जीवत ते लूटै।'

'एक एक सूं मिलि रह्या, तिनही सचु पाया।' अन् जो बाहेरच्या जगासाठी मरून गेला तो अंतर्यामीच्या जगाबाबत जागा झाला. जो बाहेरच्या जगात झोपी गेला तो अंतर्यामीच्या जगात स्थित झाला. अन् तिथे जे मीलन होतं आहे ते एकाचं एकाशी मीलन आहे. बाहेर जे मीलन आहे ते एकाचं अनेकांशी मीलन आहे. अंतर्यामी जे मीलन आहे ते एकाचं एकाशी आहे– 'एक एक सूं मिलि रह्या, तिनही सचु पाया।'

अन् अनेक, खोटं आहे. जशा सागराच्या अनेक लहरी खोटया आहेत. अन् एक सागर खरा आहे. लहरी उमटतील, संपतील. पण सागर राहील. जे नेहमी राहील तेच खरं आहे. जे बनेल अन् संपेल ते स्वप्न आहे. अनेक, असत्य आहे.

'एक एक सूं मिली रह्या, तिनही सचु पाया'–
जो एकाशी एकरूप झाला त्यानं सत्य मिळवलं.

'प्रेम मगन लौलीन मन सो बहुरि न आया।' – अन तिथे जी घटना घडते ती मोठी विलक्षण आहे. प्रियकर अन् प्रेयसी दोघंही तिथे हरवून जातात अन् प्रेमच उरतं.

या जगातही जेव्हा प्रियकर बाहेर कुणा प्रेयसीला भेटतो तेव्हा ते दोन असतात. अन् मग आयुष्यभर त्यांचा हाच तर प्रयत्न असतो की कसं तरी एक होऊन जावं. अन् ते होऊ नाही शकत. म्हणून जीवनात दुःख अन् व्यथा होते. ते बाहेर होऊच नाही शकत. एक होण्याचा कुठला मार्ग नाही. कितीही प्रयत्न करा. जितका प्रयत्न कराल तितकं अपयश हाती येईल. म्हणून प्रेम करणारे खूप व्यथित होतात. त्यांची आकांक्षा खरी आहे. पण जिथे ते आकांक्षा पूर्ण करण्याचा प्रयत्न करताहेत ती जागा चुकीची आहे. ती आकांक्षा अंतर्यामी तृप्त होईल. त्यांची तृष्णा तर योग्य आहे. पण ज्या सरोवरी ते बसले आहेत ते आटलेलं आहे. तिथे पाणी नाहीये.

कुणी अंतर्यामी येताच... तिथे तत्क्षणी एक ज्योत येते अन् दुसऱ्या ज्योतीशी एकरूप होऊन जाते. दोन दिव्यांच्या ज्योती जवळजवळ ठेवा. मग दिवे तर दोनच असतील पण त्यांच्या ज्योती एक होऊन जातात. दिवे कसे एक होऊ शकतील? दिवा तर 'अनेका'च्या जगाचा भाग आहे.



शरीर, मातीचा दिवा आहे. त्याच्या अंतर्यामी तेवत असलेली आत्म्याची ज्योत आहे. तुम्ही दिव्यांना एकरूप करण्याचा प्रयत्न करता आहा. खूप वैतागात पडाल. अडचणच अडचण हाती येईल. शेवटी अपयश विषाद, संताप, चिंता, रोग... पण कधी तुम्ही निरोगी नाही होऊ शकणार.

ज्योत एकरूप होऊ शकते कारण ज्योत निराकार आहे. एक ज्योत दुसऱ्या ज्योतीच्या आकारावर आदळत नाही. तिथे आकार नाहीये. एक ज्योत दुसऱ्या ज्योतीत अशी लीन होऊन जाते जणु ती नेहमीच एक होती. तुम्ही फरकही नाही करू शकणार. गंगा अन् यमुनादेखील भेटतात तर तुम्ही फरक करू शकता की ही पाहा गंगा अन् ही यमुना. रंग वेगवेगळे आहेत. पण जेव्हा दोन ज्योती एकरूप होतात तेव्हा तुम्ही कुठला भेद नाही करू शकणार.

अंतर्ज्योति...जेव्हा तुम्ही अंतर्यामी जाता... अचानक एक झेप... अन् केवळ एक उरला. तिथे प्रियकरदेखील नाहीये वा प्रेयसीदेखील नाहीये, भक्तदेखील नाहीये वा परमात्मादेखील नाहीये. तिथे केवळ प्रेमच राहिलं, ऊर्जा राहिली, ज्योत राहिली.

'प्रेम मगन लौलीन मन सो बहुरि न आया।'–

अन् जो अशा प्रेमात लीन होऊन गेला तो मग पुन्हा नाही येत. मग त्याच्या येण्याची कुठली गरज नाही राहिली. त्याचा धडा पूर्ण झाला.

'कहै कबीर निहचल भया, निरभै पद पाया।'

अन् जो अशा अंतरी प्रवेशला त्याची ज्योत स्थिरावली. आता त्याच्यात कुठलं कंपन नाही–निश्चल....! कुणी वाऱ्याची झुळूक आता त्याला थरथरवत नाही. कारण अंतर्यामी कुणी वाऱ्याची झुळूक पोचतच नाही.

जोवर तुम्ही बाहेर आहा तोवर तुम्ही थरथरतच राहाल. तिथे हजार वादळं होताहेत. पण जेव्हा तुम्ही अंतर्यामी आपल्या घरी माघारी येता, तेव्हा तिथे कुठलं वादळ कधी नाही पोचत. तिथे निश्चल. . .

'कहे कबीर निहचल भया, निरभै पद पाया'–अन् जेव्हा चेतना निश्चल होते तेव्हाच निर्भय बनते. त्या आधी निर्भय नाही बनू शकत...! भयानं थरथरत राहाते.

'संसा ता दिन का गया, सतगुरू समझाया।'

कबीर म्हणतो आहे, ज्या दिवशी सद्गुरूनं ही गोष्ट समजावून दिली, ही चावी सोपवली त्याच दिवशी सारी शंका नाहीशी झाली; त्याच दिवशी मनातले सारे संदेह हरवून गेले.

☐ ताओ उपनिषद् भाग–२ ४०–००
☐ ,, ,, भा.–३ (रा.) ७५–००
,, ,, ,, (सा.) ४५–००
☐ महावीर-वाणी भाग–१ ३०–००
,, ,, भाग–२ ३०–००
☐ पाथेय ३५–००
☐ मुल्ला नसरुद्दीन ५–००
☐ शून्य की नाव ५–००
☐ पथ की खोज २–००
☐ विद्रोह क्या है २–५०
☐ सत्य के अज्ञात सागर का आमन्त्रण २–००
☐ सूर्य की ओर उड़ान २–००
☐ जनसंख्या-विस्फोट १–५०
☐ क्रांतिकी वैज्ञानिक प्रक्रिया १–५०
☐ प्रेम के स्वर २–००
☐ युवक और यौन १–००
☐ बिखरे फूल १–००
☐ गांधीवाद : एक और समीक्षा ५–५०
☐ अस्वीकृति में उठा हाथ ५–००

☐ महावीर : मेरी दृष्टि में ४०–००
☐ पथ के प्रदीप ६–००
☐ सत्य की खोज ५–००
☐ गहरे पानी पैठ ७–००
☐ ज्यों की त्यों धरि दीन्ही चदरिया ५–००
☐ धर्म और राजनीति १–००
☐ क्रान्तिनाद १–५०
☐ प्रेम है द्वार प्रभु का १२–००
☐ पद घुंघरू बांध ८–००
☐ समुंद समाना बुन्द मे. ९–००
☐ घाट भुलाना बाट बिनु १२–००
☐ सूली ऊपर सेज पिया की ७–००
☐ मिट्टी के दिये ५–००
☐ संभावनाओं की आहट ८–००
☐ शान्ति की खोज ३–५०
☐ आनंद-गंगा ५–००
☐ असंभव क्रांति ६–००
☐ क्या ईश्वर मर गया है ५–००
☐ मै मृत्यु सिखाता हूँ ४०–००

## पॉकेट बुक्स

संभोग से समाधि की ओर ३–००
अन्तर्यात्रा ,, ,,
शून्य की नाव ,, ,,
ज्यों की त्यों धरि दीन्ही चदरिया ,, ,,
समाजवाद से सावधान ,, ,,
भारत गांधी और मैं ३–००
हँसना मना है ,, ,,
अमृत की दिशा ,, ,,
शून्य का दर्शन ,, ,,

# भगवानश्रींचे इंग्रजी साहित्य

**Available Books of Bhagwan Shree Rajneesh**

D = Deluxe edition O = Ordinary edition

Rs.

1. Hammer on the Rock 125-00
2. The Hidden Harmony 80-00
3. When the Shoe Fits 75-00
4. YOGA : the Alpha and the Omega Vol. I 75-00
   Vol. II 75-00
5. Returning to the Source 65-00
6. Tao : The Three Treasures I 75-00
7. The Mustard Seed (O) 75-00
8. The way of the White Cloud 66-00
9. No Water, No Moon (O) 40-00
10. The Book of the Secrets Vol. I 65-00
    Vol. II 65-00
    Vol. III 65-00
    Vol. IV 75-00
11. Just like That 70-00
12. Tantra : the Supreme Understanding 75-10
13. Roots and wings (D) 65-00
    (C) 50-00
14. And the Flowers Showered 75-00
15. Neither This Nor that 65-00
16. The Silent Explosion 12-50
17. The Ultimate Alchemy Vol. I 40-00
    Vol. II 75-00
18. Two Hundred Two (Mulla Jokes) 10-00
19. Wisdom of folly (Mulla Jokes) 6-00
20. Meditation : A New Dimension 3-00
21. Beyond and Beyond 3-00
22. L. S. D. : A Shortcut to False Samadhi 2-00
23. Yoga : As a Spontaneous Happening 2-00
24. The Vital Balance 1-50
25. The Gateless Gate 2-00
26. The Eternal Message 3-00

**Translated Books from Original Hindi Version**

27. Seeds of Revolution 8-00
28. From Sex to Super Consciousness 6-00
29. Towards the Unknown 1-50
30. Lead kindly Light 1-50

जीवन जागृति केंद्राचे
आगामी प्रकाशन

# हे जिवंत मंदिर तुम्हाला बोलावतं आहे

पुढील महिन्यांत प्रसिद्ध होत आहे.

संपर्क :
**जीवन जागृति केंद्र**
१०१, टिंबर मार्केट, पुणे २.
फोन : ४४१६८